'अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे.'

# दोन शब्द

राजेंद्र नारायण लालजी यांच्या या पुस्तकाचे प्रकाशन करताना आम्हाला अत्यानंद होत आहे. हे पुस्तक सर्वप्रथम सन १९७८ मध्ये इस्लामी साहित्य सदन, रामनगर, वाराणसी (यु.पी.) येथे प्रकाशित झाले होते. आता या पुस्तकाचे प्रकाशन साहित्य सौरभ, नवी दिल्ली तर्फे होत आहे.

या पुस्तकात तळटीपा देण्यात आलेल्या आहेत. त्या तळटीपा आदरणीय अबू मुहम्मद इमामुद्दीन रामनगरीद्वारा लिखित आहेत.

राजेंद्रजी यांच्या लिखाणात प्रकाशकाकडून काही ठिकाणी कंसात स्पष्टीकरण देण्यात आलेले आहे.

देशबंधुंमध्ये एकमेकांच्या धर्माविषयी आणि तत्त्वज्ञानाविषयी नि:पक्षपातीपणे विचार होण्यासाठी देशात वातावरण निर्माण व्हावे हाच हेतू पुस्तकाच्या प्रकाशनामागे आहे. आम्ही आशा करतो, की या पुस्तकाद्वारे इस्लामचे खरे स्वरुप वाचकाला कळेल तसेच देशात सांप्रदायिक सौहार्द निर्माण होण्यास मदत होईल.

या पुस्तकाचे उर्दू, इंग्रजी तसेच अन्य भारतीय भाषांमध्ये अनुवाद केले जातील.

प्रकाशक

# निवेदन

राजेंद्र नारायण लालजी यांचे पुस्तक प्रकाशित करताना आम्हास अत्यानंद होत आहे. आमच्या विचारवंत वाचकांना विनंती आहे की, लेखकाने हिंदू धर्म, बौद्ध मत आणि ईसाई धर्माबाबत विचार व्यक्त केले आहेत आणि आम्ही समर्थनार्थ कंसामध्ये ज्या तळटीपा दिलेल्या आहेत, त्यास विवाद समजू नये. वास्तवावर आधारित लेखकाचे विचार अधिक विचारणीय ठरतात. राजेंद्रजी ही प्रथम व्यक्ती नाही, ज्यांनी इस्लामबद्दल असे विचार व्यक्त केले आहेत. भारत आणि इतर देशांतील विचारवंत अशा प्रकारचे मत व्यक्त करीत असतात आणि बहुतेकजण इस्लाम स्वीकार करतात. इस्लामचे प्रशंसक तर अनेक आहेत.

या संदर्भात आम्ही एक उदाहरण देऊ इच्छितो. जानेवारी १९७९ साली रायचूर (कर्नाटक) येथे श्री रामजींच्या सन्मानार्थ तेथील मुस्लिमांनी एक सभा आयोजित केली होती. सभेसाठी एस.पी., डेप्युटी कमिशनर ऑफ पोलीस आणि जिल्ह्यातील प्रमुख अधिकारीगण उपस्थित होते. न्यायाधीश महाशयांना आणि सर्व प्रमुख अतिथींना पवित्र कुरआनच्या कन्नड भाषेत भाषांतरित प्रती भेट देण्यात आल्या. त्या वेळी न्यायाधीश महोदयांनी भाषण करताना सांगितले,

''पवित्र कुरआनचा अनुवाद माझ्या हातात आहे. मला अत्यानंद होत आहे, हे माझे सौभाग्य आहे की, खुदाने माझ्यावर आज कृपा केली आहे. मी पवित्र कुरआनचे अध्ययन अद्याप केलेले नाही. म्हणूनच या पवित्र ग्रंथाविषयी मी आपणास विस्तारपूर्वक आज काही सांगू शकत नाही. परंतु मी कुरआन संदेशाविषयी काही ग्रंथ यापूर्वीच वाचले आहेत आणि काही अध्यायांचे अध्ययनसुद्धा केलेले आहे. त्यावरून मला ज्ञात झालेले आहे की, कुरआन अल्लाहचा संदेश आहे, जे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरित झालेले आहे आणि हा संदेश एखाद्या विशिष्ट संप्रदायासाठी नाही, तर समस्त मानवजातीसाठी आहे. 'इस्लाम' हा शब्दच समस्त मानवजातीला शांतीचा संदेश देत आहे. कुरआन सांगतो की, ईश्वर एक आहे जो सृष्टीचा स्रष्टा, स्वामी आणि समस्त मानवांसाठी दयाळू व कृपाळू आहे. पवित्र कुरआनचा प्रारंभ मात्र ईशप्रशंसेने झाला आहे, की ''सर्व स्तुती अल्लाहसाठी आहे, जो समस्त सृष्टीचा स्वामी आहे, अतिदयावान व कृपाशील आहे. अंतिम दिनाचा स्वामी आहे. आम्ही तुझीच उपासना करतो आणि तुझीच साहाय्यतेसाठी तुझीच याचना करतो. आम्हाला सरळमार्ग दाखव.'' मी या शब्दांना 'आम्हाला सरळमार्ग दाखव' पुन्हा म्हणत आहे. प्रथम अध्याय (सूरह फातिहा) चे हे शब्द गुरुकिल्लीस्वरूप आहेत. या पवित्र ग्रंथात समस्त मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी याच

प्रथम अध्यायाची व्याख्या दिलेली आहे. पवित्र कुरआन स्पष्ट सांगत आहे की, ईश्वर एक आहे जो सृष्टीचा स्वामी आहे. म्हणून ईश्वराने दाखविलेल्या मार्गाने जीवन कंठले पाहिजे. कुरआनच्या शिकवणीनुसार, जीवनव्यवहार पार पाडण्यातच मानवाच्या सतत वाढणाऱ्या समस्यांचे निराकरण होणार आहे.'' ('दावत' दिल्ली, दिनांक ४-२-१९७९)

कर्नाटकच्या वेगवेगळ्या शहरांमध्ये पवित्र कुरआनच्या अनुवादाचे उद्घाटन समारंभ झाले आहेत. हे अनुवाद हिंदू बंधुंना देण्यात आले. धार्मिक नेत्यांनीसुद्धा न्यायाधीश महोदयांसारखे पवित्र कुरआनविषयी मत व्यक्त केले आहे.

पवित्र कुरआनला कोणी ईशग्रंथ मानो अथवा न मानोत, परंतु तो अंतिम धर्मग्रंथ आहे याचा कुणीही अस्वीकार करू शकत नाही. पवित्र कुरआन अवतरणाला चौदाशे वर्षे लोटली. या कालावधीत मोठमोठे तत्त्वज्ञ, वैज्ञानिक, राजकारणी, साहित्यकार आणि कवी होऊन गेले, परंतु कुणीही हा दावा केला नाही की, ''मी ईशदूत आहे, आणि माझ्यावर ईशज्ञान अवतरित होत आहे.'' याचप्रमाणे कोणत्याही लेखकाने अथवा दार्शनिकाने असा दावा केला नाही की, ''माझी कृती एक ईशग्रंथ आहे.'' हा एक उघड पुरावा आहे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचा ईशसंदेशवाहक होण्याचा आणि पवित्र कुरआन ईशग्रंथ असण्याचा.

सत्य ईशधर्माचा आधार आहे. सत्य हे आहे की, अल्लाहव्यतिरिक्त कुणीही दुसरा ईश्वर नाही आणि त्याच्या ईशत्वात कुणीही त्याचा भागीदार नाही. तोच सृष्टीनिर्माणकर्ता, स्वामी, संचालक, नियंता आणि उपास्य आहे. त्याच्याव्यतिरिक्त कोणीही उपास्य नाही. जो कोणी निर्विकार मनाने विचारपूर्वक पवित्र कुरआनचे अध्ययन करील त्याला ज्ञात होते की, पवित्र कुरआन आरंभापासून अंतापर्यंत याच निष्ठेवर आधारित आहे. त्याचा व्यक्तिगत, कौटुंबिक, सामाजिक, सांस्कृतिक, राजनीतिक आणि आर्थिक आदेशांचा सारांश मात्र हा आहे की, मानवी जीवनासंबंधी समस्त विषयांच्या ज्ञानाचा स्रोत एकमात्र हा विश्वास (एक ईश्वर) आहे. याच धर्माचे नाव इस्लाम आहे, म्हणजेच पूर्ण जीवनात ईश्वराचा आज्ञाकारी बनून राहाण्याचा धर्म म्हणजे इस्लाम होय.

पवित्र कुरआन हे सांगत नाही की, तोच एकमात्र ईशग्रंथ आहे आणि तो एक नवीन धर्म घेऊन अवतरित झाला आहे. पवित्र कुरआन विस्तारपूर्वक सांगत आहे की, सृष्टीच्या प्रारंभापासून मनुष्यातूनच ईश्वराने आपले संदेशवाहक (प्रेषित) नियुक्त केले आणि त्यांच्यामार्फत ईश्वर आपली शिकवण देत गेला. याच ईशसंदेशवाहकांना प्रेषित म्हटले जाते. पवित्र कुरआननुसार जगाच्या प्रत्येक लोकसमुदायात ईश्वराचे प्रेषित होऊन गेले आहेत आणि त्या सर्वांची मूलभूत शिकवण हीच होती ज्यास इस्लाम म्हटले गेले आहे. अंतर मात्र देश आणि काळाचे होते, आंतरिक आत्मा सर्वांचा एकच होता.

ईशसंदेशवाहकांची परंपरा राहिली आहे की, प्रत्येक संदेशवाहक (प्रेषित) आपल्या अगोदर आलेल्या प्रेषितांचे आणि त्यांच्यावर अवतरित ईशग्रंथाचे समर्थन करीत असे. याच परंपरेनुसार आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनीसुद्धा आपल्या अगोदर आलेल्या प्रेषितांचे आणि ईशग्रंथाचे समर्थन केले आहे. राजेंद्र नारायणजींनी खरे सांगितले आहे की, इस्लाम ईशधर्माचे अंतिम संस्करण आहे. हीच गोष्ट अल्लाहने पवित्र कुरआनमध्ये स्पष्ट केली आहे.

''मग हे प्रेषित (स.)! आम्ही तुमच्याकडे हा ग्रंथ पाठविला जो सत्य घेऊन आला आहे आणि अलकिताब (पूर्वकालीन ईशग्रंथ) पैकी जे काही त्याच्यासमोर उपलब्ध आहे त्यातील सत्य प्रमाणित करणारा व त्याचा संरक्षक व त्याची निगा राखणारा आहे.''

(दिव्य कुरआन, ५:४८)

आम्ही ज्या शब्दाचा अर्थ 'संयोजक आणि रक्षक' घेतला आहे तो मोठा अर्थपूर्ण शब्द आहे. मूळ अरबी शब्द 'मुहैमिन' आहे. याचा अर्थ देखरेख, ग्वाही, समर्थन, अमानत आणि सहाय्यतासुद्धा होतो. म्हणून वरील वचनाचा (आयत) अर्थ हा आहे की, सर्व सत्य शिकवणीं ज्या पूर्वीच्या ग्रंथांत होत्या, कुरआनने त्या सर्वांना सुरक्षित करून ठेवले आहे. कुरआन त्यांच्यावर देखरेख करणारा आहे. त्यांचा रक्षक आहे, समर्थक आहे. त्यापूर्वीच्या ग्रंथात जी काही ईशशिकवण उपलब्ध आहे त्यास सत्य सिद्ध करणारा आहे आणि त्यांच्या सत्य असण्याची ग्वाही देतो. त्या ग्रंथामध्ये (कुरआनपूर्वीच्या) ईश्वराशिवाय इतरांच्या गोष्टींचा समावेश केला गेला, त्या सर्वांना कुरआन साक्षीने अलग काढले जाऊ शकते.

या तथ्याला समजून न घेता कुरआन अवतरणकाळातील विधर्मी आणि वर्तमान काळातील विरोधक म्हणतात की, कुरआनमध्ये अगोदरच्या ईशग्रंथांची नक्कल आहे आणि त्याच शिकवणींची उजळणी आहे. त्यांच्या म्हणण्याचा अर्थ हा निघतो की, कुरआन ईशग्रंथ नाही तर मानवरचित पुस्तक आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी पूर्वीच्या धर्मग्रंथांचे वेगवेगळे अंश एकत्र करून संकलित केले आहेत, आणि त्यास (कुरआन) ईशग्रंथ म्हटले जात आहे. भ्रम आणि अज्ञानावर आधारित निष्कर्षांची पडताळणी करणे तर्कसंगत ठरते.

एखादा लोकसमूह जेव्हा धर्म भ्रष्ट होतो आणि या लोकसमूहाची सुधारणा करण्यासाठी त्यांच्यातूनच एक प्रेषित नियुक्त केला जातो, तेव्हा तो लोकसमूह दोन भागांत विभक्त होतो. एक वर्ग सामान्यांचा ज्यात स्वतंत्र विचारांच्या निस्वार्थी लोकांचा समावेश होतो. ते अल्लाहच्या प्रेषिताचा स्वीकार करून त्याचे समर्थक बनतात. दुसरा वर्ग जडवादी, स्वार्थी नेतेगणांचा आणि तथाकथित धर्ममार्तडांचा असतो. हा वर्ग विचार करतो की या व्यक्तीला प्रेषित म्हणून मान्य केल्यावर त्याच्या अधिन बनून राहावे लागेल. त्यांचा

मानसन्मान आणि स्वार्थ समाप्त होईल. म्हणून हा दुसरा वर्ग प्रेषितांचा विरोधी बनतो व त्यांची हत्यासुद्धा करण्याचा प्रयत्न करू लागतो. या अवस्थेत त्यांच्यावर ईशकोप होतो आणि त्यांचा सर्वनाश होतो. सुरक्षितपणे तेच राहातात, जे त्या प्रेषिताला मान्य करतात. परंतु कालांतराने या लोकांत काही पिढ्या गेल्यानंतर त्यांच्या संततीमध्ये हळूहळू बिघाड निर्माण होतो आणि ते लोक भ्रष्टाचारी बनतात. धार्मिक शिकवणीत ते आपल्या फायद्यासाठी बदल करतात आणि नवीन धर्मशास्त्र रचतात. अशा प्रकारे धर्माला ते आपल्या आचारविचाराला अनुकूल बनवितात. कारण लोक त्यांना भ्रष्टाचारी (आचरणभ्रष्ट) म्हणू नये आणि त्यांचा मानसन्मान आणि स्वार्थ अशा प्रकारे सुरक्षित राहावा यासाठी.

यहुदी आणि ख्रिस्ती लोकांनी आपला धर्म आणि धार्मिक ग्रंथाबरोबर हाच दुर्व्यवहार केला. पवित्र कुरआन अगदी स्पष्ट करून सांगत आहे की आदरणीय मूसा, आदरणीय दाऊद, आदरणीय इसा इ. प्रेषितांची शिकवण काय होती? यहुदी आणि ख्रिश्चन लोकांनी या शिकवणीस किती भ्रष्ट करून टाकले आहे? यावरून आपण अंदाज करू शकता की, आपल्या भारत देशातसुद्धा काय झाले नसेल? जर हे घडले नसेल तर श्रीकृष्णांचे म्हणणे की, "जेव्हा जेव्हा धर्माची हानी होते तेव्हा मी येतो." माझ्या मते श्रीकृष्णाने स्वत:ला ईश्वर म्हटले नसेल, तर ईशदूत म्हटले असेल. परंतु वरील वचनावरून हेच सिद्ध होते की, भारतातसुद्धा काळानुरुप धर्म विकृत होत गेला आहे. गीतेमध्ये कृष्णाला वृंदावनच्या गोपींसह आम्ही कोणत्या रूपात पाहातो? बुद्ध तर वेदशास्त्राचे विरोधक होते, कालांतराने त्यांनासुद्धा देवत्व बहाल केले गेले आणि त्यांना अवतार मालिकेत सामावून घेण्यात आले. स्वामी दयानंदजींनी आयुष्यभर काय सांगत आपला प्राण सोडला?

जर आमच्यात धर्माची सत्य भावना असेल आणि आम्ही सत्याचे खरे जिज्ञासू असू तर आम्हाला निष्पक्ष भावनेने वेद, उपनिषद आणि कुरआनचे अध्ययन करावे लागेल. अंतत: आम्हाला कळून चुकेल की, या ग्रंथामध्ये किती प्रमाणात ईशशिकवण उपलब्ध आहे आणि किती प्रमाणात बाह्य हस्तक्षेप आणि बाह्य मिश्रण उपलब्ध आहे.

- अबू मुहम्मद इमामुद्दीन

रामनगर (वाराणसी)

# भूमिका

एका चमत्कारापासून ते क्षुल्लक घटनासुद्धा ईशइच्छेचा परिणाम आहे. हा सिद्धान्त या पुस्तकाद्वारा समजून येण्यास मदतच होईल. हा ग्रंथ प्रश्नोत्तराच्या स्वरूपात आहे आणि संक्षिप्तता या ग्रंथाची विशेषता आहे. तथ्यांना सर्वसामान्यजनांच्या समक्ष ठेवले गेले पाहिजे. ते त्यांच्यासाठी आरशासारखे आहे, जेणेकरून सर्वसाधारण विषयांचा परिचय सुगमतेने व्हावा आणि केवळ सामान्यज्ञानाच्या आधारावर स्वयंसिद्ध निष्कर्षावर यावे. असे करताना त्यांनी कोणत्याच प्रकारचे मानसिक तणाव आणि अस्थैर्याला सामोरे जाऊ नये. निवृत्त झाल्यानंतर वृद्धावस्थामध्ये मला आध्यात्मिक आणि मानसिक शांतीची अत्यंतिक आवश्यकता भासली. याचसाठी मला माझ्या धर्माचा आणि अन्य धर्मांचा अभ्यास करावा लागला. तुलनात्मक अभ्यास आणि मनन केल्यानंतर मी इस्लामला मानवी आणि सर्व समस्यांचे एकमेव समाधान म्हणून मान्य केले. या समस्या व्यक्तिगत, कौटुंबिक, नागरिक, राजनैतिक, नैतिक, धार्मिक, मनोवैज्ञानिक, आर्थिक, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय, इहलौकिक अथवा पारलौकिक स्वरुपाच्या सर्व समस्यांसाठी इस्लाम गुरुकिल्ली सिद्ध झाली आहे. इस्लामची स्पष्टता, शक्ती, इस्लामचे साधेपण, सार्वभौमिकता, प्रामाणिकता असंशोधनीय आहे. एक ईश्वरत्व व विशुद्ध एकेश्वरत्व प्रत्यक्ष आहे. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे व्यक्तिमत्त्व अप्रतिम आणि संपूर्ण आहे. एखादी व्यक्ती इस्लामला शुद्ध हृदयाने आणि पक्षपातविरहित होऊन समजून घेण्याचा प्रयत्न करते तेव्हा ती व्यक्ती निश्चित या निष्कर्षाप्रत येते की, इस्लाम एक स्वयंसिद्ध वास्तविकता आहे. इस्लामच्या अगोदरचे अरब पापग्रस्त होते. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांना इस्लामची शिकवण दिली आणि अल्पावधित त्यांना सर्वथा धार्मिक आणि मानवतेचे आदर्श बनविले. कोणत्याही कामांध, क्रोधी, लोभी, व्यभिचारी, जुगारी, भांडखोर, हिंसक, दारुड्या, निकृष्ट, अविश्वासू आणि चोराला त्यांच्याच पिढीमध्ये त्यांचे हृदयपरिवर्तन करणे हा अद्वितीय ऐतिहासिक चमत्कार आहे. हे सर्वमान्य आहे की, भारतात राम, कृष्ण, बुद्ध आणि इतर जे महापुरुष झाले ते सर्व विद्वान आणि राजघराण्याशी संबंधित होते. देशामध्ये मोठमोठे विद्वान आणि तत्त्वज्ञ होते. रामाचे वडील दशरथ यांचे राज्य आदर्श राज्य होते. कृष्णाचा मामा कंस अत्याचारी होता. कौरव आणि पांडवांचे भांडण कौटुंबिक होते. याव्यतिरिक्त देशात इतर प्रकारचा अधर्म आढळून येत नाही. बुद्धसुद्धा देशात फैलावलेल्या अधर्माविरुद्ध उठले नव्हते, तर म्हातारपणाची जरता आणि एका शवाला पाहून ते प्रभावित झाले आणि विरक्ती स्वीकारली.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचा देश टोळ्याटोळ्यांमध्ये विभागला गेला होता. तिथे त्या काळी कोणतीच शासनव्यवस्था नव्हती. साऱ्या देशात दुराचार बोकाळला

होता. दारू, व्यभिचार, अत्याचार, लूटपात इ. सर्व प्रकारची कुकर्मे प्रचलित होती. यहुदी आणि ख्रिश्चनसुद्धा आचारभ्रष्ट आणि धर्मभ्रष्ट झाले होते. संपूर्ण देशभर मूर्खतापूर्ण अनेकेश्वरत्व बोकाळला होता. प्रेषित मुहम्मद (स.) यांचे घराणे अनेकेश्वरवादींच्या पुजाऱ्यांचे घराणे होते. ती धार्मिक नेतेमंडळी होती, परंतु विद्याहीन होती. मक्का शहर हे त्या काळी अनेकेश्वरत्वाचे केंद्र बनले होते. त्या मक्का शहरात बोटावर मोजण्याइतपतच लोकांना अक्षरओळख होती. ते सर्वत: विद्याहीन होते. मग तेथे शाळा आणि गुरुजनांचे अस्तित्वच मुळी नव्हते. अशा वातावरणात प्रेषित मुहम्मद (स.) निरक्षरच राहून गेले. त्या काळी मक्कावासीयांजवळ चार-सहा पानांचे एखादेसुद्धा धार्मिक पुस्तक उपलब्ध नव्हते की, त्यांच्या देवीदेवतांचे कथासंग्रहसुद्धा उपलब्ध नव्हते. सर्वकाही तोंडी, अव्यवस्थित, परिवर्तनीय कुप्रथा आणि परंपरा प्रचलित होत्या आणि संपूर्ण अरब देश त्यात लिप्त झालेला होता.

हा तो काळ होता जेव्हा जगात कुठेही सत्यधर्म अस्तित्वात नव्हता. अशा स्थितीत जगाला एकेश्वरवादी सत्यधर्माची ओळख करून देण्यासाठी आणि आचारविचारात त्या सत्यधर्माला परिवर्तीत करून दाखविण्यासाठी अल्लाहने आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना उभे केले. एकटे उभे केले! त्यांची शिकवण, त्यांचे आदेश आणि उपदेशाने एक एकेश्वरवादी समूह स्थापित झाला. त्यांनी तेवीस वर्षांच्या निरंतर प्रयत्नांनी सर्वव्यापक क्रांती घडवून आणली आणि ईशसत्यधर्म स्थापित करून दाखविला. मानवी इतिहासात असे दुसरे उदाहरण सापडत नाही. एक शुद्ध सभ्यता, संस्कृती आणि सुदृढ शासन स्थापित झाले. अशा प्रकारच्या क्रांतीचे उदाहरण मानवी इतिहासात जगात सापडत नाही. अरब लोक सामूहिकरीत्या प्रदीर्घ अपराधी वृत्तींच्या रोगापासून, इस्लामरूपी औषधीमुळे अल्पावधितच रोगमुक्त झाले. हे औषध ऐतिहासिक प्रमाणाच्या आधारावर आजच्या युगातील अशा रोगग्रस्त लोकसमूहासाठी एक प्रामाणिक आणि अचूक औषध म्हणून उपलब्ध आहे. सध्याच्या युगात संपूर्ण जग या प्रकारच्या रोगाने ग्रस्त आहे. परंतु भारतात हा रोग महामारीचे रूप धारण करीत आहे. ज्यासाठी या ईश्वरदत्त औषधीचा प्रयोग अनिवार्य आणि आवश्यक आहे. भारतात मंत्र्यापासून संत्र्यापर्यंत तसेच बाजारापासून कार्यालयापर्यंत भ्रष्टाचार फोफावला आहे. शंका आहे की, काही अपवाद वगळता संपूर्ण राष्ट्र अपराधप्रवृत्त बनले आहे. इस्लाम कोणत्याच धर्माशी वैमनस्य बाळगत नाही. प्रेषित मुहम्मद (स.)! यांच्या अगोदरच्या सर्व प्रेषितांचा आदर करतो. इस्लामची मान्यता आहे की, प्रेषित मुहम्मद (स.) अंतिम ईशदूत आहेत. त्यांच्या पूर्वीच्या प्रेषितांकरवी अवतरित ईशमार्गदर्शनात स्वार्थी लोकांद्वारा आणि काळानुरुप परिवर्तन केले गेले. परिणामत: मनुष्य सत्यमार्गापासून विचलित झाला. जग सत्यमार्गाला विन्मुखले जाऊ लागले. संपूर्ण

जगाला कुरआन शिकवणीच्या स्वरूपात अंतिम परिमार्जित आणि सर्वथा असंशोधनीय नियम व आदेश देते. ही वास्तविकता आहे. राम, कृष्ण, मूसा, बुद्ध व येशूनंतर प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आगमन ईश्वरेच्छेने आणि मानवकल्याण हेतुने झाले होते. ''ईश्वर एक आहे आणि मुहम्मद (स.) त्याचे अंतिम दूत आहेत'' हा इस्लामचा मूलमंत्र आहे. ऐतिहासिकदृष्ट्या वेद प्राचीनकालीन पुस्तक आहे आणि हिंदू विश्वासानुसार ते ईश्वरकृत आहे. वैदिक मान्यतेनुसार ईश्वराचे एकत्व सिद्ध होते. त्यात स्पष्ट उद्घोष आहे, ''एकमेवो हे, द्वितियो नास्ती'' ज्याचा अर्थ होतो, ईश्वर एक आहे आणि दुसरा कुणी नाही. इतर आत्मिक धर्मसुद्धा एक ईश्वर मानतात. कालांतराने त्यांचा एकेश्वत्व विशुद्ध राहिला नाही. म्हणून इस्लामचा एकेश्वरत्व जो मूलमंत्राचा प्रथम अंश आहे, सर्वग्राह्य आहे. मूलमंत्राचा दुसरा अंश 'मुहम्मद (स.) ईश्वराचे अंतिम दूत आहेत. हा अंशसुद्धा स्वयंसिद्ध तथ्य आहे. कायद्यासाठी प्रमाण देण्याची आवश्यकता आहे? सांगितले गेले की, ''प्रत्यक्ष किम प्रमाणम्'' अर्थात जे प्रत्यक्ष आणि स्पष्ट आहे त्याच्यासाठी प्रमाणाची आवश्यकता काय? गणित आणि विज्ञानात बिंदूसाठी परिभाषा आहे की, बिंदूला माप नाही. त्याच्या प्रमाणासाठी सांगितले जाते की स्वयंसिद्ध आहे. हेच तत्त्व प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या अंतिम प्रेषितच्या तत्त्वाला लागू पडते. (आता वेद ऋषींची भविष्यवाणी आणि बुद्धाच्या सूचनेनुसार मुहम्मद (स.) अंतिम प्रेषित असल्याचे प्रमाणित होते. याविषयी माहितीसाठी डॉ. वेदप्रकाश उपाध्याय यांच्या पुस्तकातील 'भूमिका' पाहिली पाहिजे. ते लिहितात, ''ऐतिहासिक विषयावर शोध करण्याची माझी इच्छा असते. वेदांमध्ये, बायबलमध्ये आणि बौद्ध ग्रंथात ऋषीच्या रूपात ज्यांच्या आगमनाविषयी घोषणा केली आहे, ते मुहम्मद (स.) आहेत. म्हणून मला प्रेरणा मिळाली की, या सत्याला उघड करणे आवश्यक आहे. मग लोकांना ते वाईट का वाटेना.)

मी धर्मात संकुचित भावनेचा पक्षपाती नाही. एखाद्या ठिकाणी एखादी गोष्ट उचित आणि उपयुक्त असेल तर त्याचा बहिष्कार करण्याचा मी प्रयत्न करत नाही. वेदांमध्ये बारा पत्नीं असलेल्या उष्टरोही ऋषीचा उल्लेख आहे, ज्याचे नाव 'नराशंस' आहे. नराशंसचा अर्थ सायणाचार्यानुसार हा आहे की, जो मनुष्यद्वारा प्रशंसित आहे. मी सायणशी सहमत नाही. माझ्या मतानुसार, नराशंस अशा व्यक्तीचा सूचक आहे जी प्रशंसित आहे. 'मुहम्मद' शब्द 'नराशंस'चा अरबी अनुवाद आहे.''

'मुहम्मद' शब्दाचा अर्थ तोच आहे जो वेदप्रकाशजींनी केला आहे. सायणाचार्यच। अर्थ घेतला तर तोसुद्धा योग्य वाटतो, कारण जगात प्रेषित मुहम्मद (स.) यांची जितकी प्रशंसा झाली आहे आणि होत आहे तितकी दुसऱ्या व्यक्तीची झाली नाही आणि होणारही नाही.

महात्मा बुद्धाच्या सूचनेविषयी वेदप्रकाश लिहितात,

ऋषीला बौद्ध धम्माच्या भाषेत बुद्ध म्हटले जाते. गौतम बुद्धाने आपल्या मृत्युसमयी प्रिय शिष्य नंदीजवळ सांगितले होते की,

''नंदा, या जगात मी पहिला बुद्ध नाही की अंतिम बुद्धसुद्धा नाही. या जगात सत्य आणि परोपकाराची शिकवण देण्यासाठी आणखी एक बुद्ध येईल. तो पवित्र अंत:करणाचा असेल. त्याचे हृदय शुद्ध असेल. ज्ञान आणि बुद्धीने संपन्न सर्वांचा नायक असेल. ज्याप्रकारे मी जगाला अनश्वर सत्याची शिकवण दिली त्याचप्रमाणे तोसुद्धा जगाला सत्याची शिकवण देईल. जगाला तो असा जीवनमार्ग दाखविल जो शुद्ध (अमिश्रित) आणि पूर्ण असेल. नंदा, त्याचे नाव मैत्रेय असेल.''

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे विविध गुण आणि विशेषता संबंधी डॉ. वेदप्रकाश यांनी भविष्यवाणीं संग्रहित केली आहे आणि ते सर्व प्रेषित मुहम्मद (स.) यांना लागू होतात. महात्मा गौतम बुद्धाची भविष्यवाणी शब्दश: प्रेषित मुहम्मद (स.) यांना तंतोतंत लागू पडते जणूकाही त्यानी प्रेषितांना प्रत्यक्ष पाहिले असावे. डॉ. वेदप्रकाश यांनी बौद्ध विद्वानांच्या लेखांद्वारा सिद्ध केले की, बौद्ध भाषेमध्ये 'मैत्रेय'चा अर्थ दया आहे आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या गुणांपैकी एक गुणवाचक नाव 'रहमत' आहे. याचा अर्थ 'दया' आहे. अंतिम ईशग्रंथ कुरआनचे एक वचन (आयत) आहे,

हे प्रेषित मुहम्मद (स.) आम्ही तुम्हाला तर जगवासीयांसाठी कृपा बनवून पाठविले आहे. (दिव्य कुरआन, २१:१०७)

(वेदप्रकाशजींनी वरील कुरआनोक्तीला आपल्या ग्रंथात लिहिले आहे.)

एक गैरमुस्लिम व्यक्ती आपल्या सामान्य बुद्धीने स्वीकार करील की, प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यानंतर दुसरी अशी कोणतीही व्यक्ती जगात झाली नाही, ज्याला धर्म प्रवर्तकाच्या स्वरुपात अनुयायांची विशाल संख्या आणि अटल मान्यता प्राप्त झाली. जर कोणी दु:साहस करून हा दावा करतो की, इस्लामसारखा संख्येने आणि श्रद्धाशीलतेने दुसरा वैश्विक धर्म शक्य आहे, तर ती व्यक्ती वेडसर समजली जाईल. अशा प्रकारे इस्लामचा मूळमंत्र (कलमा) ''अल्लाहशिवाय दुसरा कोणी ईश्वर नाही आणि मुहम्मद (स.) अल्लाहचे प्रेषित आहेत.'' त्याच प्रकारे स्वयंसिद्ध आहे ज्याप्रकारे भूमितीचे एखादे प्रमेय सिद्ध करण्याच्या प्रक्रियेत असते. इस्लामच्या या वैशिष्ट्यामुळे मुस्लिमेतरांनी सत्याकडे पाठ फिरवू नये. दिवसाला दिवस व रात्रीला रात्र म्हणणे उचित आहे. मी विशेषकरून आपल्या हिंदू बांधवांना विनंती करतो की, त्यांनी माझ्या या निष्कर्षाला आपल्या सहिष्णुवृत्तीने आणि विचारस्वातंत्र्याच्या सिद्धान्ताच्या प्रकाशात पडताळून

पाहावे. त्यांनी इस्लाम आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांना निपक्षपातीपणे समजून घेण्याचा प्रयत्न करावा आणि आपल्या निराधार शंकेचे निरसन करावे. अशामुळे ते आपल्या विचारस्वातंत्र्य सिद्धान्ताला गौरवान्वित करू शकतील. आपल्या धर्मात सर्प आणि पिंपळाच्या वृक्षाला आराध्य बनवून सहिष्णुतेचा पर्याप्त परिचय होत नाही. तसेच मांस, मदिरा, मैथून, मत्स्य आणि मुद्राच्या अनुयायींना धार्मिक मान्यता दिल्याने विचारस्वातंत्र्य प्रशंसेस पात्र ठरत नाही. ही एक घोर विडंबना आहे की, जगाचे सर्वश्रेष्ठ प्रेषित आणि अद्वितीय सुधारक आणि मानवजातीचे महानतम परोपकारी प्रेषित मुहम्मद (स.) यांना आपल्या मनात आणि बुद्धीमध्ये योग्य स्थान आम्ही देत नाही. अनेक हिंदू धर्म गाथांमध्ये देवता आणि अवतारांद्वारा पापी लोकांच्या विनाशाचा उल्लेख आला आहे. परंतु प्रेषित मुहम्मद (स.) जे ऐतिहासिक महामानव आहेत, त्यांनी पापी लोकांचा नाश न करता पापी वृत्तीचा नाश केला. या प्रक्रियेद्वारे सामूहिकरीत्या हृदयपरिवर्तन करून अत्यल्प काळात पापींना पुण्यात्मा बनवून सोडले. हजार वर्षांपासून जास्त काळ हिंदू मुस्लिमांच्या संपर्कात आहेत, परंतु आश्चर्याची गोष्ट आहे की, ते इस्लामची सामाजिकता आणि नैतिकतेपासून आपल्या धर्माची वृद्धी त्या प्रमाणात करू शकले नाही जेवढी अपेक्षित होती. इस्लाम आगमनापूर्व भारतात अन्य धर्म, सभ्यता, संस्कृतींशी हिंदू धर्मिय पूर्ण समन्वयवादी होते. या उदासीनतेचे मूळ कारण विजयी आणि पराजित मानसिकता आणि द्वेषभावना आहे. तसेच यास मुस्लिमसुद्धा तितकेच जबाबदार आहेत. या मोठ्या कालखंडात मुस्लिमांनी विशेषत: आपली राजनैतिक ओळख करून दिली, परंतु त्यांनी हिंदूंना इस्लामचा परिचय करून दिला नाही.

हे कटु सत्य आहे की, भारतात मुस्लिम आले परंतु इस्लाम आला नाही. (हे सत्य आहे की, इस्लाम भारतात मुस्लिम विजेताद्वारा आला नाही, तर मुस्लिम संतांद्वारा भारतात आला. त्या महापुरूषांनी इस्लामचा आदर्श निर्माण केला. ते उच्च-नीच, स्पृश्य-अस्पृश्य इ. भेदाभेद मानत नसत. त्यांनी पददलितांना उभे केले आणि जवळ केले. त्यांना मानवी हक्क बहाल केले. पुढे त्या लोकांनी विश्वबंधुत्व, समानता आणि न्यायप्रियतेच्या आधारावर इस्लामचा स्वीकार केला. भारतातील बहुतेक लोक याच संताद्वारे इस्लामचा स्वीकारकरते झाले.) मुस्लिमांनी राजनीतिला मुख्य रूप दिले आणि इस्लामी नैतिकता, सभ्यता आणि संस्कृतीला गौण रूप दिले. इस्लामच्या आदर्शानुरुप मुस्लिम स्वत:ला बनवू शकले नाही म्हणून भारतात इस्लामची ओळख पूर्णत: झाली नाही. भ्रष्टाचाराच्या फोफावलेल्या आजच्या स्थितीत ती योग्य वेळ येऊन ठेपली आहे. मुस्लिमांनी स्वत:ला इस्लामी नैतिकतेच्या साच्यात प्रशिक्षित करून उच्च जीवनादर्शाने इस्लामचे आकर्षक मूळरूप जगात प्रदर्शित करावे, कारण मानवतेच्या कल्याणासाठी हे अत्यावश्यक आहे.

भारत सद्य:स्थितीत विशेषत: भ्रष्टाचाराने बरबटलेला आहे. राजनैतिक लोकांत नैतिकतेचे पुनर्जागरण अशक्य आहे. विचारप्रधान हिंदू आणि कर्मप्रधान मुस्लिमांनी मिळून व्याप्त अनैतिकतेच्या निवारणासाठी मोहीम अग्रेसित करावी.

या पुस्तिकेसंबंधी काही माहिती देणे आवश्यक आहे. इस्लामची प्रशंसा करण्यासाठी अनेक मुस्लिम आणि मुस्लिमेतर विद्वानांनी बरेच काही लिहिले आहे. द्वेषप्रवृत्तीच्या तथाकथित विद्वानांनी इस्लाम आणि इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स.) यांची भरपूर बदनामी केली आहे. वाचक या पुस्तिकेसंबंधी विचार करू शकतो की, माझ्यासारखा सामान्य माणूस इस्लामविषयी काय नवीन लिहिणार? याविषयी माझे नम्र निवेदन आहे की, इस्लाम जगात आज सर्वसामान्यजनांचा सर्वप्रिय धर्म आहे. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स.) हेसुद्धा सामान्यजनांतूनच नियुक्त झाले. ईश्वराच्या इच्छेनुरुप जगात सर्वसामान्य जीवन प्रेषित मुहम्मद (स.) यांनी व्यतीत केले. जनसामान्यांना त्यांच्यापर्यंत पोहचण्यासाठी कधीच अडसर आला नव्हता. (आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांचे संपूर्ण अरब देशावर शासन स्थापित झाले होते. त्यांनी इच्छिले असते तर स्वत:साठी राजमहाल बनविला असता आणि थाटामाटात जीवन व्यतीत केले असते. परंतु या अपूर्व सफलतेमुळे त्यांच्या अतिसाधारण जीवनात नाममात्र बदल झाला नाही. मातीच्या भिंती आणि खजुरीच्या पानांनी साकारलेले छत असलेल्या झोपडीसाठी दारसुद्धा पाचटाचे होते. त्यांचे नियमित भोजन साधे असे. बहुतेक वेळी उपाशी राहात असे. त्यांच्या अंगावरील वस्त्रे थिगळ लावलेली असत. चटई आणि घोंगडी हाच बिछाना होता. खजुरीच्या पानांचे मसजिदीचे छत होते. त्या मस्जिदीत बसून अरब देशाचे शासन चालवित असत. ईश्वराशी प्रार्थना करत असत की, ''मी निर्धनात राहून जीवन व्यतीत करीन आणि निर्धनांमध्येच राहून मृत्यू पत्करेल.'' असे होते प्रेषित मुहम्मद (स.) यांचे साधे सरळ जीवन! इतिहासात अशा शासकाचे उदाहरण सापडत नाही.) यामुळे माझ्यासारखी सामान्य व्यक्तीद्वारा या पुस्तिकेचे प्रकाशन विशेष महत्त्वाचे ठरते. सर्वसाधारणजन जगात बहुसंख्य आहेत. मला फक्त आशा नाही तर विश्वाससुद्धा आहे की, इस्लामचे पूर्वग्रही टीकाकार या पुस्तिकेद्वारा इस्लाम आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याविषयीच्या चुकीच्या धारणेपासून मुक्त होतील.

जुलै १९७८

**राजेंद्र नारायण लाल** एम.ए.

वाराणशी

# धर्माचे महत्त्व

**प्रश्न – या वैज्ञानिक युगातही धर्माचे महत्त्व शिल्लक आहे काय?**

**उत्तर :–** अवश्य! विज्ञान आणि धर्म एक दुसऱ्याचे विरोधक नाहीत. विज्ञान एक विकासशील घटक आहे. पाषाणकाळापासून ते परमाणु युगापर्यंत विज्ञान विकसित होत आले आहे आणि भविष्यात होत राहील. पाषाणकाळात दगडाच्या शस्त्रांचे तेच महत्त्व होते जे आजच्या आधुनिक युगात ॲटमबॉम्बचे आहे. मागील काळात बैलगाडीचे तेच महत्त्व होते, जसे आज एक विमानाचे आहे. यावरून स्पष्ट होते की, वैज्ञानिक शोधकार्याचे महत्त्व कालपरत्वे बदलत जाते. परंतु याविरुद्ध सत्यधर्माचे सिद्धान्त शाश्वत आणि सार्वकालिक आहेत. विज्ञान मनुष्याच्या राहणीमानात वृद्धी करू शकते. विज्ञानावर नियंत्रण केले गेले नाही तर मानव हा दानव बनण्यास वेळ लागत नाही. दुसरीकडे एक परिपूर्ण धर्म राहणीमानाच्या बरोबरीने मनुष्याला जीवनस्तरासाठी (स्टँडर्ड ऑफ लिव्हिंग) प्रेरित करीत राहतो. सिनेमाद्वारा मनोरंजनाचा जीवनात उपयोग होतो, मात्र मुलाबाळांच्या सार्वांगिन विकास मूल्यांसाठी नाही. एक मोटरकार अवश्य आहे पण भ्रष्टाचाराने नाही. चोरबाजारीने प्राप्त केलेल्या धनामुळे बनलेले राहणीमान अनुचित असते. हे कोण अस्वीकार करील की, महानतम वैज्ञानिक संशोधनानेसुद्धा मानवतेचा उद्धार होत नाही. मनुष्य जेवढा भौतिक सुखाच्या मागे पळत आहे तेवढा तो खऱ्या आनंदापासून विमुख होत आहे. वर्डसवर्थने खरे सांगितले होते की, "आम्ही भौतिक सुखात मग्न आहोत." विज्ञान एक दुधारी तलवार आहे. वीज निश्चित घराला प्रकाशमान करते परंतु बेसावधपणे मनुष्य विजेला स्पर्शकर्ता झाला तर त्याच्या जीवनाला हीच वीज अंधकारमय बनवते. त्या मनुष्याला वाचविणाऱ्याचीसुद्धा हीच गत होते जर वाचवणाऱ्या मनुष्याने सावधानीचे उपाय केले नाहीत. विज्ञानामध्ये गुण आणि अवगुण दोन्ही आहेत, परंतु विज्ञानाचे अवगुण आणि वाईट परिणाम परिपूर्ण धर्माच्या सार्वभौम सिद्धान्तांद्वारा नियंत्रित केले जाऊ शकतात. ॲटमबॉम्ब, हायड्रोजन बॉम्ब आणि न्युट्रॉन बॉम्ब विज्ञानाची देणगी आहे. परंतु रेडक्रॉस आणि संयुक्त राष्ट्र संघ धर्माची देणगी आहे. कोणत्याही परिस्थितीत आम्हाला जगणे आहे आणि दुसऱ्याला जगू देणे आहे. म्हणून संतोष आणि देवाणघेवाणीच्या नीतीद्वारा व्यक्तिगत, कौटुंबिक, सामाजिक, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय सुखशांती सुनिश्चित होऊ शकते. परलोकाची चिंता करणे आहे, कारण सत्यधर्म ईश्वराच्या माध्यमातून एक मनुष्याचे दुसऱ्या मनुष्याशी संबंध स्थापित करतो. म्हणूनच सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, सर्वव्यापक, ईश्वराच्या छत्रछायेत आम्हाला आमच्या जीवनरूपी भवनाचे निर्माण करणे आहे. त्या इमारतीत अनेक मजले असतील, ज्यात स्वतः, कुटुंब, समाज, राष्ट्र तथा सर्व मानवतेसाठी

जागा उपलब्ध असेल. या इमारतीचा पाया सत्यधर्मावर आधारित असेल आणि एकेश्वरत्व आणि विश्वबंधुत्वाच्या सिमेंटने ती बनलेली असेल.

**प्रश्न - आता प्रश्न निर्माण होतो की, जगात जितके धर्म प्रचलित आहेत ते सर्व एकदुसऱ्यांच्या विरोधी आहेत आणि स्वत:लाच फक्त श्रेष्ठ सिद्ध करू पाहातात. या समस्येवर काय उपाय आहे?**

**उत्तर :-** यासाठी जीवंत आणि महत्त्वपूर्ण धर्माचे विश्लेषणात्मक, तुलनात्मक आणि समन्वयात्मक अध्ययन अपेक्षित आहे. जगात एक धर्म असणे असंभव आहे. म्हणून आम्ही या संदर्भात सर्वोत्तम गुणग्राही बनू शकतो. चीनचा प्राचीन धर्म कन्फ्युशस धर्म होता. आता तो तिथे अस्तित्वात नाही. जैन धर्म हिंदू धर्मात विलीन झाला आहे. पारशी धर्म, शीख धर्म, ज्यू धर्म आणि शिन्तो धर्म क्षेत्रिय आहेत आणि संख्येच्या दृष्टीने नगण्य आहेत. येथे आपण याच कारणासाठी हिंदू धर्म, बौद्ध धम्म, ख्रिस्ती धर्म आणि इस्लाम धर्माचा तुलनात्मक अभ्यास करू या. येथे हा उल्लेख, करणे आवश्यक वाटते की, या सर्व धर्मांची समीक्षा स्वामी दयानंद सरस्वती यांनी 'सत्यार्थ प्रकाश' नामक त्यांच्या पुस्तकात केली आहे. खेदाने म्हणावे लागते की, स्वामीजींनी पूर्वग्रहदूषित आणि संकुचित दृष्टिकोन स्वीकारला आणि 'ध' चा 'मा' करण्यासाठी समीक्षेचा आधार घेतला. परिणाम हा झाला की, स्वामीजी धर्मसुधार भावनेने जरी प्रेरित होते तरी आपल्या आंदोलनाला ते व्यापक बनवू शकले नाहीत. त्यांचा आर्य समाज कार्यात नाही परंतु विचारात धर्मांध होता, अल्पकाळातच महत्त्वहीन आणि शक्तीहीन झाला.

# हिंदू धर्म

हिंदू धर्माचा कुणीही संस्थापक नाही. (या संदर्भात प्रसिद्ध विद्वान रामधारी सिंह दिनकर आपला ग्रंथ 'संस्कृती के चार अध्याय' मधील प्रकरण 'हिंदू संस्कृती के रचयिता' मध्ये लिहितात, खरे तर प्रेषित इसा (अ.) यांनी ख्रिस्ती धर्माला आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लामला जन्म दिला, तसे हिंदू धर्म मात्र एका पुरुषाची रचना नाही. आपण जर एखाद्या सामान्य हिंदू धर्मियाला विचारले की, आपला धर्मग्रंथ कोणता आहे? तर उत्तरात तो कदाचित कोणतेही नाव सांगू शकणार नाही. याचप्रमाणे आपण त्याला प्रश्न विचारला की, तुमचा मुख्य धर्मनेता, अवतार, प्रेषित कोण आहे? या प्रश्नाच्या उत्तरातसुद्धा तो एखादे खात्रीलायक नाव घेऊ शकत नाही आणि हे योग्य आहे. हिंदू धर्म एखाद्या महात्म्यापासून आलेला नाही की एखाद्या संप्रदायापासून त्याची स्थापना झालेली नाही. खरे तर हिंदुत्व निश्चित अशा कोणत्याच श्रद्धेवर व विश्वासावर आधारित नाही, तर तो अनेक विश्वासांचा समुचय आहे. ज्याप्रकारे भारतीय जनतेची रचना अनेक जातींची मिळून झाली आहे. त्याचप्रमाणे हिंदुत्वसुद्धा अनेकानेक जातींच्या धार्मिक विश्वासांचा मिळून बनलेला आहे.) परंतु यानुसार वेदश्रुति ईश्वरकृत ग्रंथ आहेत. परंतु सामान्य हिंदूने कदाचित वेदग्रंथ पाहिला असेल. त्याच्या घरात वेदग्रंथ उपलब्ध नसतो. अशा स्थितीत सामान्य हिंदूसाठी वेदग्रंथाद्वारा ज्ञान प्राप्त करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. हेच नाही तर सनातन धर्म जो हिंदूंच्या बहुमताचा धर्म आहे, तोसुद्धा ब्राह्मणव्यतिरिक्त इतरांना वेद वाचण्यास मनाई करतो. हिंदू धर्मात आश्चर्याची गोष्ट आहे की, सामान्य हिंदू ज्यामध्ये क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र सर्वांचा समावेश होतो, ते आपल्या ईश्वरकृत ग्रंथाचे अध्ययन करू शकत नाही की वाचू शकत नाही.

वेद समजण्यासाठी सामान्य बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे आहेत. त्यामुळे ब्राह्मणाव्यतिरिक्त अन्य हिंदूंना वेदांपासून दूर ठेवण्यात आले. हे ईश्वरकृत ग्रंथ एखाद्या संस्कृत ग्रंथालयाची शोभा वाढवित राहिले अथवा शहरातील बोटावर मोजता येतील इतक्या ब्राह्मणांच्या घरातील कोनाड्यातील शोभा वाढवित राहिले होते. शतकापूर्वी आर्य समाजाने या धारणेविरुद्ध आंदोलन केले आणि वेद संपूर्ण हिंदू लोकांसाठी आहेत अशी घोषणा केली. परंतु प्रचलित हिंदू धर्मावर या आंदोलनाचा काहीएक परिणाम झाला नाही. इतर वर्ग आणि स्त्री समाज आपल्या ईश्वरकृत ग्रंथ वेदाच्या अध्ययनापासून आणि मनुस्मृतिच्या आदेशाचे पालन करण्यापासून वंचित राहिले. ही दशा आहे हिंदूंच्या ईश्वरकृत धर्मग्रंथांची! वेदाची ऐतिहासिक प्राचीनता आहे.

वैदिक धर्माचा आधार एकेश्वरत्व होते. त्यात मूर्तिपूजा नव्हती की त्यात

पुनर्जन्माचा सिद्धान्त मूळत: नव्हता. (वाचकांना राजेंद्रजींचे हे वाक्य आश्चर्यकारक वाटेल की, वैदिक काळात पुनर्जन्माला मान्यता नव्हती. परंतु हे फक्त राजेंद्रजीच सांगत नाहीत, तर दुसरे विचारशील विद्वानसुद्धा सांगतात. रामधारी सिंह दिनकर 'संस्कृति के चार अध्याय' मध्ये लिहितात, नास्तिक आणि भौतिकवादीव्यतिरिक्त असे हिंदू फार कमी आहेत जे परलोकभय बाळगून नाहीत. ही वैदिक काळातील भावनेपेक्षा भिन्न भावना आहे. वैदिक ऋषी नास्तिक तथा भौतिकवादी तर मुळीच नव्हते. मृत्यूचे भय ही भावना त्यांच्यात उपलब्ध नव्हती की, स्वर्ग व नरकची भावनासुद्धा नव्हती. वास्तविकपणे आत्मा पुनर्जन्म, कर्मफलवादाविषयी वैदिक ऋषींनी अधिक काही विचार केलाच नव्हता. (पृष्ठ ८१)

वर्तमानकालीन पुनर्जन्म सिद्धान्ताचा आधार तो विचार आहे की, मनुष्य, पशुपक्षी, कीटक, वृक्ष इ. जेवढे प्राणी आहेत ते सर्व आपापल्या पुनर्जन्माच्या कर्मफळामुळे आहेत. जर हे मान्य केले नाही तर ईश्वरावर अन्यायाचा दोषारोप होतो की, त्याने कुणाला उच्चकोटीचे शरीर दिले तर कुणाला निम्नकोटीचे शरीर दिले. मनुष्यातसुद्धा कुणाला बलवान तर कुणाला दुर्बल, कुणाला धनवान तर कुणाला निर्धन, कुणाला बुद्धिमान तर कुणाला बुद्धिहीन बनवून सोडले. याचा अर्थ हा होतो की, सर्व प्राण्यांत मुख्य प्राणी मनुष्य आहे. सुकर्म आणि कुकर्म नियम मनुष्याला लागू होतात. या सिद्धान्तावर हा प्रश्न उभा राहातो की, मनुष्यापूर्वी पृथ्वीवर धान्य जर नसते तर मनुष्याने काय खाल्ले असते? तो जीवित कसा राहिला असता ? तसेच हा प्रश्नसुद्धा निर्माण होतो की, आदि सृष्टीमध्ये मनुष्याच्या पूर्वीच्या जन्माच्या कर्मफळाचा काहीच अर्थ उरत नाही. याचे उत्तर दिले गेले आहे की, सृष्टी अनादि अनंत आहे. ही सृष्टी अनादि काळापासून बनत आली आहे आणि अनंत काळापासून बिघडत आली आहे. ग्रंथानुसार ही सृष्टी स्वयं उत्पन्न झालेली नाही तर तिला ईश्वराने उत्पन्न केले आहे आणि त्या ईश्वराद्वाराच तिचा अंत होणार आहे. म्हणून सृष्टीचे अनादि आणि अनंतचक्र कशाप्रकारे सिद्ध होते? उत्तर आहे की, ईश्वर अनादि अनंत आहे तथा त्याचे कार्यसुद्धा अनादि अनंत आहे.

सृष्टीसुद्धा ईश्वराचे एक कार्य आहे, मग सृष्टीचा विनाश का होतो? आपण युक्ती आणि प्रमाणाविना सृष्टीला अनादि अनंत जरी मानले तरी पुनर्जन्म सिद्ध होत नाही. प्रत्येक सृष्टीत त्याची अवस्था अशी असेल की, सर्व प्राणी निर्माण होतील आणि त्यांचा पुनर्जन्म प्रलयकाळापर्यंत सिद्ध होणार नाही. श्री. दुर्गाशंकर सत्यार्थी यांनी ऋग्वेदाच्या सात मंचानुसार सिद्ध केले की, कुरआनप्रमाणे वेदसुद्धा दोनच जन्म दाखवितात. एक जन्म वर्तमान लोकांचा आणि दुसरा प्रलयकाळानंतरचा. प्रलयकाळातील जन्म कर्मफळ भोगण्यासाठी असेल. स्वामी दयानंद यांच्या मताबद्दल आश्चर्य प्रकट केले गेले की, ते पुनर्जन्म कसे मानत होते? सत्यार्थीजींचा लेख (मर्कजी मक्तबा इस्लामी, नवी दिल्लीद्वारा

प्रकाशित पुस्तक) 'वेद और कुरआन'मध्ये पाहिला जाऊ शकतो. (वास्तविकपणे वेदांत इतकी पराकोटींची बुद्धीविरुद्ध मान्यता असू शकत नाही. ही नंतरच्या कुण्या एखाद्या विचारकाची धारणा असावी ज्याने सृष्टीवर विचार केलेला दिसत नाही. ईश्वराने सृष्टीचे निर्माण विभिन्नतेवर केले आहे आणि ती विभिन्नतेवरच चालत आहे. धरती आणि आकाश, सूर्य आणि चंद्र, तसेच सर्व मनुष्य एकाच श्रेणीचे असते तर कोणी कुणाला मानले नसते आणि व्यवस्था स्थापित झालीच नसती.) चार वर्ण अर्थात ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्राचे विभाजनसुद्धा एका अर्थाने अर्थशास्त्राच्या श्रमविभाजनाच्या रूपात होते. आपापसात या वर्णांत विवाह होत असत. विश्वामित्र क्षत्रिय होते, तरी गुणानुसार ब्राह्मण ऋषी बनले. तसेच परशुराम ब्राह्मण असूनसुद्धा गुणानुसार क्षत्रिय ठरले. वशिष्ठ ऋषीविषयी म्हटले जाते की, ते दासीपुत्र होते. वाल्मिकी ऋषीविषयी म्हटले जाते की, ते कोळी होते. रामाविषयी म्हटले जाते की, त्यांनी शबरी या भिल्ल समाजाच्या स्त्रीची उष्टी बोरे खाल्ली होती. रामाच्या मान्यतेने रावण आणि बलीच्या विधवांचा त्यांच्या दिरांशी पुनर्विवाह झाला होता. तसे पाहाता वेदांमध्ये नियोगचा उल्लेख आहे. कृष्णाच्या मान्यतेने सगोत्र विवाह होत. रामाने आपल्या पत्नीचा त्याग केला होता. ते उचित होते की अनुचित ही दुसरी गोष्ट आहे. दशरथाच्या तिन्ही राण्या कौसल्या, कैकयी आणि सुमित्रा पती निधनानंतर सती गेल्या नाहीत, तसेच कृष्णच्या वेळी कुंतीसुद्धा सती गेली नाही.

यावरून स्पष्ट होते की, वैदिक आणि रामायण, महाभारत काव्य काळातील धर्म आणि संस्कृती मध्यकाळात बदलून गेली आणि वर्तमान हिंदू धर्म आणि संस्कृती आपले आदर्श राम आणि कृष्ण काळातील धर्म आणि संस्कृतीपेक्षा अगदी विपरीत आहेत. हिंदू धर्मात परिवर्तन आणि विरोधाभास वेळोवेळी आर्य, द्रविड, सिंधू, हूण, कुशाण इ. जातींचे मिश्रण आणि त्यांच्या धार्मिक विश्वासाच्या मिश्रणाच्या फलस्वरुप झाले आहे. वेद, उपनिषद आणि अरण्यक यांचा एकेश्वरत्व हळूहळू बहुदेवतावादात परिवर्तीत होत गेला. ऋषींद्वारा प्रतिपादित स्मृती आणि तत्त्वज्ञानालासुद्धा धार्मिक मान्यता प्राप्त होत गेली. रामायण आणि महाभारत काव्यांनासुद्धा धार्मिक मान्यता मिळाली. तत्पश्चात अठरा कपोलकल्पित पौराणिक गाथांना तर सर्वतोपरी धार्मिक मान्यता मिळाली होती. जैन धर्म आणि बौद्ध धम्माचासुद्धा हिंदू धर्मात विलय झाला. तसेच वैष्णव, शैव आणि शाक्ताशिवाय वाममार्गालासुद्धा विचारस्वातंत्र्याच्या नावाने धार्मिक मान्यता मिळत गेली. चारशे वर्षांपूर्वी तत्कालीन बोली भाषेत आपल्या आत्मिक सुखासाठी आपल्या पत्नीपासून त्रस्त तुलसीदासाच्या 'रामचरितमानस' या काव्याला सर्वतोपरी आणि व्यापक मान्यता मिळाली. पुढे उत्तर भारतात हाच ग्रंथ हिंदू धर्माचा आधारस्तंभ बनला. रामचरित्रमानस हिंदीमध्ये असल्याने दक्षिण भारतातील हिंदूसाठी तो अप्रिय आहे. एवढेच

नाही तर तुलसीकृत इतर ग्रंथांनासुद्धा धार्मिक मान्यता आहे. विशेषकरून 'हनुमान चालिसा' या ग्रंथाला धार्मिक ग्रंथ म्हणून मान्यता उत्तर प्रदेशमध्ये आहे. फक्त चारशे वर्षांपूर्वी लिहिलेल्या बोली ब्रजभाषामध्ये सूरदासाने रचलेल्या 'सूरसागर'चा पाठ धार्मिक लोक करतात. नवीन नवीन देवीदेवतांचा शोध अद्याप होत आहे. ज्यात आधुनिक आविष्कार 'संतोषी माँ' या देवीचा आहे. हिंदू धर्म विशाल धार्मिक साहित्याचा दावा करतो. ईश्वरकृत चार वेदांमध्ये ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद आहेत. यांच्याविषयी बहुसंख्य हिंदू अनभिज्ञ आहेत. अनेक स्मृती आहेत ज्यांच्या विचारधारा वेगवेगळ्या आहेत. अनेक उपनिषद, आरण्यक आणि योगवशिष्टसुद्धा आहे. सहा दर्शनशास्त्रे आहेत आणि सर्वांची धारणा वेगवेगळी आहे. अल्पसंख्य शास्त्रींना वगळता बहुसंख्य हिंदू या ग्रंथांच्या विषयसूचीपासूनसुद्धा अनभिज्ञ आहेत. रामायणसुद्धा दोन आहेत. एक वाल्मिकीकृत रामायण आणि दुसरे तुलसीदासकृत रामायण. त्या दोघांचे आदर्शसुद्धा भिन्न भिन्न आहेत. पुराण अठरा प्रकारचे आहेत. त्यांच्यानुसार शंकरजी भांगसुद्धा पीत होते आणि देवांचे देव इंद्र इतके कामूक होते की, स्वर्गातील अप्सरांशी संतुष्ट न होता पृथ्वीवर उतरले आणि अहिल्या नामक ऋषींच्या पत्नीशी बलात्कार केला. सहा शास्त्र आहेत ज्यांच्यापासून सामान्य हिंदू पूर्ण अपरिचित आहेत. हिंदू धर्माचे पाच प्रमुख आचार्य आहेत. शंकर, रामानुज, बल्लभ, माधव आणि निम्बार्क, यातील प्रत्येकाची परंपरा, आदर्श आणि मान्यता सर्व भिन्न भिन्न आहेत. या पाच प्रमुख आचार्यांव्यतिरिक्त आणखी अनेक आचार्य आहेत. तीन मुख्य संप्रदाय आहेत. वैष्णव, शैव आणि शाक्त. सर्व एकदुसऱ्यांच्या विरोधी आहेत. घोर आस्तिक शंकराचार्यांचे अनुयायींसुद्धा हिंदू आहेत आणि नास्तिक जैन आणि वाममार्गीसुद्धा हिंदू आहेत. कांदा, लसूनदेखील न खाणारेसुद्धा हिंदू आहेत आणि घोर अखाद्य पदार्थ खाणारे औघड लोकसुद्धा हिंदू आहेत. पितांबर धारण करणारे वधूसुद्धा हिंदू आणि सर्वथा नग्न राहणारे साधूसुद्धा हिंदू आहेत. वैष्णव पंथात मांसाहार वर्ज्य आहे. शाक्त मांसाहारी आहेत. हिंदू सिद्धान्ताने एकेश्वरवादी आहेत, परंतु कर्माने मात्र बहुदेववादी आहेत. सिद्धान्ततः हिंदूंचा ईश्वरकृत धर्मग्रंथ वेद आहे, परंतु उत्तर भारतात मात्र रामचरितमानस आहे. दक्षिण भारतातील हिंदूची धार्मिक मान्यता अगदी विरोधी आहे. संस्कृतीच्या नावाने होळीमध्ये शीवीगाळ करणे, दीपावलीत जुगार खेळणे आणि शिवरात्रीप्रसंगी भांग पिणे धार्मिक कृत्य समजले जाते. रामचरितमानसमध्ये ब्राह्मणवादाचे इतके उदात्तीकरण आहे की, सर्वगुणविहीन ब्राह्मणसुद्धा पूजनीय आहे, परंतु सर्वगुणसंपन्न शूद्र मुळीच नाही. सर्व स्मृतींमध्ये मनुस्मृती सर्वाधिक शूद्रद्रोही आहे. वस्तुतः तुलसीदास आणि मनु यांचा हाच हेतू होता, जे त्यांनी शूद्रांविषयी लिहून ठेवले आहे. मग जर हे ग्रंथ नसते तर हिंदू धर्माच्या विशाल साहित्यावर काहीच परिणाम झाला नसता. हीच

स्थिती पुराणांची आहे. परलोकाच्या कल्पनेबाबत हिंदू धर्मात विरोधाभास आहे. हिंदू स्वर्ग-नरकसुद्धा मानतात आणि पुनर्जन्मसुद्धा मानतात. शिखासूत्रसुद्धा काल्पनिक आहेत. हिंदू धर्माची व्याख्या अगदी अस्पष्ट आहे. संक्षिप्तपणे हिंदू धर्म एक अद्भूत विरोधाभास आहे, कारण यात मिश्रण आहे एकेश्वरत्व आणि बहुदेवत्वाचे. हिंदू धर्म मिश्रण आहे आस्तिकता आणि नास्तिकतेचे, तसेच अद्वैतवाद आणि द्वैतवादाचे. हिंदू धर्म मिश्रण आहे विशिष्ट्य द्वैतवाद आणि द्वैताद्वैत, तसेच हिंसा आणि अहिंसेचे. हिंदू धर्म मिश्रण आहे पुनर्जन्म आणि स्वर्ग-नरकवाद, तसेच निराकारवाद आणि साकारवादाचे. हिंदू धर्म मिश्रण आहे पुराणवाद आणि दर्शनशास्त्राचे तसेच प्रवृत्तीवाद आणि निवृत्तीवादाचे. हिंदू धर्म मिश्रण आहे आशावाद आणि निराशावाद, तसेच कट्टरता आणि उदारतेचे. हिंदू धर्म मिश्रण आहे शाकाहारवाद आणि मांसाहारवादाचे. हिंदूंचे हे विशाल धर्मसाहित्य आणि विरोधाभास हिंदू विद्वानांची शोधसामग्री आहे. ज्याप्रकारे डॉ. राधाकृष्णन, तसेच यातून अध्यात्मवाद शोधून काढणारे संत स्वामी विवेकानंद, तसेच महान सुधारकांना या मिश्रणातून सुधारणा करण्याचा अवसर प्राप्त अवश्य होईल, परंतु सामान्य हिंदूला वर्तमान हिंदू धर्मापासून काहीही प्राप्त होत नाही. सामान्य हिंदू याच निष्कर्षावर येतो की, हे सर्व इंद्रजाल आहे आणि मंत्रतंत्र आहे, ज्याचे दुसरे नाव ब्राम्हणवाद आहे. हिंदू धर्मात सामान्य हिंदूसाठी व्ययशील कर्मकांड आणि शूद्रांसाठी घोर रूढीग्रस्त अपमान आहे. अडीच हजार वर्षांपूर्वी बुद्धाने या रूढीग्रस्त घोर अपमानाचा आणि आधुनिक काळात महात्मा गांधीसुद्धा निराकरण करण्यास असमर्थ ठरले. शेवटी डॉ. आंबेडकरांसारख्या आधुनिक मनुष्याने हिंदू धर्माचा त्याग केला. आंबेडकरांनी 'पुना पॅक्ट' वेळी महात्मा गांधींच्या उपवासामुळे हरिजनांना दिलेल्या स्वतंत्र मतदार अधिकाराला सोडून दिले होते. त्या वेळी त्यांनी हिंदू जातीवर फार मोठे उपकार केले. डॉ. आंबेडकरांनी बौद्ध धम्म स्वीकारताना या ऐतिहासिक तथ्याकडे लक्ष दिले असते की, बौद्ध धम्म भारतात अत्याधिक अशक्त बनवून बुद्धाला हिंदू धर्माचा अवतार मानून, चतुर ब्राह्मणांनी बौद्ध धम्माला त्याच्या जन्मभूमीतून लुप्त करून टाकले. डॉ. आंबेडकर समानतेचे आकांक्षी होते, तर त्यांनी महात्मा गांधींच्याच शब्दांना त्या वेळी पुन:स्मरण करावयाचे होते. महात्मा गांधी यांनी दक्षिण आफ्रिकेत निग्रोंवर होणाऱ्या अत्याचारांसंबंधी सांगितले होते की, ''जर एकाने जुलू (निग्रो) ख्रिस्ती धर्म स्वीकारला तर गोरे ख्रिश्चन त्याला समान दर्जा देत नाहीत, परंतु तोच जुलू (निग्रो) इस्लाम स्वीकरतो तेव्हा त्याला तत्काळ उच्च श्रेणीच्या मुस्लिमाबरोबरीची समानता प्राप्त होते.''

# बौद्ध धम्म

हा विचार सुसंगत आहे की, हिंदू धर्मापासून भिन्न रूप धारण करून बौद्ध धम्म बनण्याअगोदर बुद्ध धर्म मूलत: धर्मशास्त्र नव्हते, तर तर्कशास्त्र होता. ही तत्कालीन हिंदू धर्म अर्थात ब्राह्मणवादाच्या अतिभ्रष्ट रूपाची प्रतिक्रिया होती. तत्कालीन ब्राह्मण संस्कृतला आपल्या धार्मिक भाषेचे रूप देऊन लोकांचे अतिशोषण करत होते. त्या काळी हिंदू धर्मात यज्ञाचे महत्त्व जास्त होते आणि यज्ञात मोठ्या प्रमाणात जनावरे बळी दिली जात होती. जनावरांची हत्या यज्ञात अत्यंत अविवेकपूर्ण रीतीने केली जात असे. तसेच धर्मात महागड्या कर्मकांडांची चलती होती. हिंदू धर्मात निम्न जातीबद्दल तीव्र घृणा होती. गौतम बुद्ध लहाणपणापासून मोठे दयाळू आणि विचारशील होते. ते स्वभावानेच अत्याचारविरोधी आणि सुधारक प्रवृत्तीचे होते. त्यांना प्रत्येक प्रकारचे सुख प्राप्त होते. परंतु रोगी, वृद्ध आणि शव पाहून त्यांनी जगापासून विरक्ती पत्करली.

एके दिवशी त्यांनी घराचा त्याग केला. घोर तपस्येनंतर त्यांना ज्ञान प्राप्त झाले. त्यांनी घोषणा केली की, सर्व दु:खांचे कारण इच्छा आहे आणि मुक्तीसाठी तिचा त्याग करणे आवश्यक आहे. ईश्वराच्या नावाने अत्याधिक जीवहत्या आणि वैदिक धर्माच्या आडून खालच्या जातींच्या लोकांवर अपरिमित अत्याचाराच्या प्रतिक्रियेच्या परिणामस्वरुप त्यांनी अहिंसा आणि खालच्या जातींशी प्रेम करण्यावर भर दिला. त्यांनी आपल्या नैतिक सिद्धान्ताच्या प्रचारासाठी बोली भाषेचा आधार घेतला आणि वेदांना अमान्य केले. बुद्धाने प्रतिक्रियास्वरुप बौद्ध धम्मात ईश्वरालासुद्धा काहीच स्थान दिले नाही. हे समजून घेतले पाहिजे की, बुद्धाची हिंदू धर्मात सुधारणा करण्याची इच्छा होती, तरी बुद्धाची विचारधारा आणि हिंदू धर्माची मान्यता यात मौलिक फरक होता. म्हणून हिंदू धर्म आणि बौद्ध धम्म हे दोन वेगवेगळे धर्म बनले. बौद्ध धम्माचे संस्थापक बुद्ध हे राजपुत्र होते म्हणून त्यांच्या व्यक्तित्वाचा प्रभाव जनतेवर पडणे साहजिक होते. खालच्या जातीच्या लोकांशी सहानुभूति आणि प्रेमळ वागणे, तसेच बोली भाषेत धम्माच्या प्रचारामुळे फार लवकर त्यांना सफलता प्राप्त झाली आणि लोक त्यांचे अनुयायी बनत गेले. त्यांनी आपल्या धम्माला एक प्रचारधर्म बनविला. कालांतराने स्त्रियांनासुद्धा धम्मप्रचार करण्यासाठी संघात स्थान दिले. त्यांनी गृहस्थांसाठी, तसेच भिक्षू आणि भिक्षुणींसाठी वेगवेगळे नियम बनविले. त्यांच्यानंतर राजाश्रय प्राप्त करून बौद्ध धम्म खूप वाढला. अशोक, कनिष्क आणि हर्ष या राजांनी त्याच्या प्रचारासाठी मोठे योगदान दिले. ह्या सम्राटांच्या धर्मप्रचाराच्या उत्साहाने बौद्ध धम्म भारताबाहेरसुद्धा फैलावला, कारण त्या काळी बौद्ध धम्माला पर्यायी धर्म म्हणून दुसरा धर्म उपलब्ध नव्हता. कालांतराने बौद्ध धम्मात भ्रष्टाचार अतिबोकाळला, परिणामत: भारतात त्याचे पतन सुरू झाले. भिक्षू आणि

भिक्षुणींमध्ये भ्रष्टाचार आणि व्यभिचार माजला. राजाश्रय समाप्त झाल्याने अन्य ऐतिहासिक कारणांनी बौद्ध धम्म आपल्या जन्मभूमीतूनच नाहीसा झाला. तिबेटमध्येसुद्धा लुप्त झाला. आता जिथे बौद्ध धम्म जीवित आहे तो केवळ निष्क्रिय रूपात आहे. त्यात कोणतीच शक्ती नाही. भारतात म्हणजे जन्मभूमीत उन्नतीपश्चात लोप पावल्याची कारणमीमांसा होऊ शकते. ज्या मूर्तिपूजेचा बुद्धाने स्वत: विरोध केला, कालांतराने त्यांच्या अनुयायींनी त्यालाच ईश्वर मानून मूर्तीच्या रूपात बुद्धाची पूजा सुरू केली. ज्या अंधविश्वासाविरुद्ध बुद्धाने आंदोलन केले, त्या सर्व अंधश्रद्धांचा हिंदू धर्मापेक्षा जास्त बौद्ध धम्मात शिरकाव झाला. बौद्ध धम्माचे जे आकर्षक नैतिक सिद्धान्त होते जसे अहिंसा इ. त्यांना हिंदू धर्मात समाविष्ट करून चतुर ब्राह्मणांनी बुद्धाला आपल्या धर्मात अवतारचे स्थान देऊन टाकले आणि भारतातून बौद्ध धर्माला मोठ्या चतुराईने समाप्त करून टाकले. (याचबरोबर शंकराचार्यांनी बौद्ध धम्माविरुद्ध आंदोलन करून त्याचे उन्मूलन केले.)

इतिहासात अल्पकाळात इस्लाम विश्वव्यापी धर्म बनण्याचा हा एक चमत्कार आहे, तर स्वत:च्या जन्मभूमीत बौद्ध धम्माचे पतन होते हा दुसरा चमत्कार आहे. बौद्ध धम्माची आधारशिला वृद्धावस्था, रोग आणि मृत्यूभय होती, ईशभय नव्हती. पायाविना निर्मित इमारत जशी दिवास्वप्न ठरते, त्याच प्रकारे कोणत्याही धर्माचे संस्थापन ईश्वराच्या आधाराविना व्यर्थ ठरते. बौद्ध धम्माचे दहा सिद्धान्त शील, अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, संपत्ती त्याग, संगीत नृत्य त्याग, अंजन, फल आणि सुगंधीचा त्याग असामायिक भोजन त्याग, कोमलशय्या त्याग, कामिनी कंचन त्याग, हे सर्व अतिकठोर आणि अमनोवैज्ञानिक (काहींना सोडून) होते. (असे सिद्धान्त ज्यात आमरण ब्रह्मचर्याची शिकवण दिली आहे आणि त्यावर आधारित धर्म मानव प्रवृत्तीविरुद्ध आहे. त्यात ईश्वरावर विश्वास जरी असला तरी तो धर्म मानवता धर्म होत नाही आणि तो धर्म स्थिर राहू शकत नाही की, त्याच्या सिद्धान्ताचे निवारण शक्य होत नाही.) बौद्ध धम्मातील नैतिकता अनीश्वरवादामुळे व्यर्थ ठरली. कारण स्पष्ट आहे की, नैतिकतेचे क्रियान्वयन ईशभयविना असंभव आणि बकवास आहे. अनीश्वरवादी आणि निराशावादी व्यक्ती आणि सृष्टीच्या कल्याणकार्यात सहाय्यक ठरू शकत नाही. मानव आणि मानवजातीसाठी जीवनसंग्राम आवश्यक आहे. योग्यतम व्यक्तीचे अतिजीवन एक वैज्ञानिक तथ्य आहे. बिहारच्या तत्कालीन बौद्ध राजाने जेव्हा पाहिले की, खिलजी आपल्या लष्करासह चाल करून येत आहेत, तो राजधानी सोडून पळाला. अशा प्रकारे तिबेटने चीनला काहीही विरोध न करणे जीवनसंग्राममध्ये बौद्ध धम्माची असमर्थता दिसून येते. अनीश्वरवाद आणि निराशावाद मानवतेसाठी कल्याणकारी ठरूच शकत नाहीत. नैतिकतेच्या आधारावर आणि जीवनसंग्रामात यश प्राप्त करण्यासाठी हे असमर्थ ठरतात.

विचारपूर्वक पाहिल्यास बौद्ध धम्म धर्माच्या श्रेणीत येत नाही. धर्माचा मूलाधार ईश्वर तथा ईश्वरप्रदत्त ज्ञान व विश्वास आहे. बुद्ध हिंदू जातीचे होते. परंतु त्यांनी ईश्वर आणि वेद मानण्यास नकार दिला. म्हणून ईश्वर आणि वेदाचा अस्वीकार त्यांच्या धर्माचा मूलाधार आहे. मग त्यांची तपस्या आणि ध्यानधारणेचा काय अर्थ होतो? त्यांना तपस्या आणि ध्यानधारणेपासून जे ज्ञान प्राप्त झाले ते कोठून प्राप्त झाले? ज्ञानाचा स्रोत तर ईश्वर आहे आणि ईशउपासना, भक्तीची शिकवण लौकिक जीवनाच्या कल्याण आणि मोक्षाचे साधन आहे आणि हेच बुद्धाच्या शिकवणीत उपलब्ध नाही.

बौद्ध धम्माची मूळ शिकवण जगाचा त्याग आणि ब्रह्मचर्य आहे. या शिकवणीनुसार सृष्टी निरर्थक ठरते. असा धर्म व्यापक मानवता धर्म होऊ शकत नाही. पूर्ण मानवधर्म (विश्वधर्म) तोच धर्म बनू शकतो जो पूर्ण मानवी जीवनाचे संविधान आहे. त्यात लौकिक जीवनाचे नियम आहेत आणि पारलौकिक शिकवणसुद्धा आहे. दोन्ही प्रकारच्या शिकवणुकीमध्ये परस्पर संतुलन आहे, म्हणजेच तो धर्म परिपूर्ण जीवनप्रणाली आहे. बौद्ध धम्म एक प्रकारचे मत आहे. गौतम बुद्ध सहृदयी व्यक्ती होते. त्यांच्या काळात धर्माचा दुरूपयोग होत होता. कर्मकांडांची धमाल चलती होती. सदाचार आणि नैतिकतेचा ऱ्हास झाला होता. हे सर्व धर्माच्या नावाने होत होते आणि धार्मिक लोकांचीसुद्धा हीच जीवनपद्धती होती. देवदासींच्या रूपात तरुणींना मंदिरांस भेट देणे, त्यांचे नाचगाणे, पंचपक्वान्नांचा नैवद्य, गांजा, भांग इ.चे सेवन करणे धार्मिक कृत्य समजले जाणे या स्थितीत धर्म शुद्ध आणि पवित्र राहूच शकत नाही. याच बरोबरीने यज्ञ आणि त्यात पशुंची हत्या यामुळे बुद्ध हिंदू धर्मविरोधी बनले.

बुद्धाला दिसले की, धर्माला भौतिकतेने वेढले आहे. म्हणून त्यांनी अध्यात्माला आपल्या मताचा आधार बनवून संन्यास, ब्रह्मचर्य, सहृदयता, प्रेम, नम्रता, स्नेह इ. प्रचार सुरू केला. समाजावर याचा प्रभाव पडला. बौद्ध धम्म भारताबाहेर गेला, तर अन्य देशांत बौद्ध धम्माचे स्वागत झाले परंतु ते सर्व देश बहुदेववादी होते. बौद्धमताने त्यांची मान्यता आणि धारणांशी समझोता केला. परिणामस्वरुप स्वत:सुद्धा या धर्माने धर्मप्रवर्तक बुद्धाला बुद्धदेव बनवून त्याची पूजा सुरू केली. ब्रह्मचर्य आणि भिक्षू व भिक्षुणीच्या अनाचाराचासुद्धा परिणाम झाला जो देवदासी आणि देवपूजकांच्या अनाचाराचा झालेला होता. यामुळे बौद्ध धम्माला धक्का पोहचला. नंतर शंकराचार्यांनी बौद्ध धर्माविरुद्ध आंदोलन उभे केले आणि बौद्ध धर्माला भारताबाहेर केले, आणि बुद्धविहारांना नष्ट भ्रष्ट केले. परंतु यासाठी बदनामी केली जाते मुस्लिम बादशाहाची! हा एक मोठा ब्राह्मणी कावा ऐतिहासिक काळापासूनचा आहे.

बौद्ध धम्मात आणखी काही उणिवा आहेत. बुद्ध ईश्वराला मानत नाही तर प्रथम

प्रश्न हा आहे की, सृष्टीची उत्पत्ती कोणी केली? यासाठी ते कुणाला जबाबदार धरतात. दुसरा प्रश्न म्हणजे त्यांच्या तपश्चर्येचा अर्थ काय होतो? तपश्चर्येचा संबंध तर ईश्वराशीच असतो. तिसरा प्रश्न हा आहे की, ईश्वरच ज्ञानाचा स्रोत आहे. बुद्ध ईश्वराला मानत नव्हते तर त्यांच्या ज्ञानाचा मूलाधार काय होता आणि त्यांना कसे ज्ञान प्राप्त झाले? ज्या दृष्यांना पाहून ते प्रभावित झाले आणि जागतिक सुखांचा त्याग केला. त्याच्यानुसार त्यांनी काही नियम केले जे त्यागावर आधारित आहेत. या प्रकारचा धर्म पूर्ण जीवनधर्म होऊ शकत नाही आणि त्यानुसार जीवन चालू शकत नाही. चौथा प्रश्न आहे की, बौद्ध धम्मानुसार शरीराबाहेर जीवसुद्धा मरुन जातो आणि कर्मफळानुसार दुसरे शरीर निर्माण होते. अशा स्थितीत मोक्षाला अर्थच उरत नाही. मग निर्वाण आणि मोक्षचा काय अर्थ होतो? जर मनुष्य पुन्हा निर्माण केला गेला नाही तर ही सृष्टीसुद्धा निष्फळ आहे.)

# ख्रिस्ती धर्म

ख्रिस्ती धर्माचा मूळाधार आदरणीय इसा (येशू) यांच्याद्वारा बायबलच्या रूपात अवतरित ईशज्ञान होते. ईशज्ञान अवतरित करण्याची त्या काळी आवश्यकता होती. कारण यहुदी (ज्यू) धर्माच्या ग्रंथात परिवर्तन आणि हस्तक्षेप झाला होता. आदरणीय मूसा (अ.) यांच्या उपदेशापासून यहुदी लोक दूर अतिदूर गेले होते. त्यांच्यात दुराचार फोफावला होता आणि त्याला दूर करण्यासाठी येशू ईशदूताच्या रूपात आले. त्यांच्यामुळे जगाला तौरात (यहुदी धर्मग्रंथ) च्या संशोधन आवृत्तीच्या रूपात बायबल प्राप्त झाले. जगाच्या कल्याणासाठी येशूने अद्‍भूत आत्मबलिदान दिले. येशूला त्यांच्या जीवनकाळात अपेक्षित सफलता जरी प्राप्त झाली नाही तरी त्यांच्यानंतर ख्रिस्ती धर्म विश्व धर्माच्या रुपात प्रतिष्ठित बनला. येशूचा जन्म कुमारी मेरी (मरयम) व्दारा झाला. या घटनेस ईशचमत्कारांवर विश्वास ठेवणारा एक विवेकपूर्ण कथन म्हणून मान्य करतो आणि मान्य केले गेले पाहिजे.

प्रथम मानवउत्पत्ती विज्ञानासाठी रहस्य आहे. त्याचप्रमाणे प्रथम बी आणि प्रथम फळाचा प्रश्न विज्ञानासमोर रहस्य बनून आहे आणि धार्मिक लोकांसाठी ईशकृती आहे. प्राचीनतम हिंदू धर्मसुद्धा याच प्रकारच्या उत्पत्तीच्या बाजूचा आहे. शंकर स्वयंभू म्हणजे मातापिताविना होते. परंतु त्यांचे दोन पुत्र कार्तिकेय आणि गणेश होते. रामाच्या पत्नीचा (सीता) जन्मसुद्धा ह्याच प्रकारचा आहे, जिला जनकाने भूमीतून प्राप्त केले होते. कुंती कृष्णाची संबंधित होती, तिला कुमारी अवस्थेत कर्णासारखी पुत्रप्राप्ती झाली. या सर्व उत्पत्तींना हिंदू धर्म पवित्र मानतो. येशू नि:संदेह ईशदूत होते तरी ख्रिस्ती धर्मात दोषारोपण झाले. ख्रिस्ती धर्मातील त्रिमूर्ती ईशपुत्र आणि आत्मा हे हिंदूंची त्रिमूर्ती ब्रह्मा, विष्णू आणि महेशपेक्षा जास्त दोषपूर्ण आहे. हिंदूची ही त्रिमूर्ती वास्तविकपणे मुळात ईश्वराचीच गुणात्मक नावे होती. ब्रह्मा म्हणजे सृष्टी निर्माण करणारा, विष्णू म्हणजे सृष्टीचा पालनकर्ता आणि महेश म्हणजे सृष्टीचा नाश करणारा. कालांतराने जैन धर्माच्या संसर्गाने हिंदू धर्मात मूर्तिपूजा प्रचलित झाली आणि या तिघांना साकार रूप देण्यात आले. परंतु ती निराकार ईश्वराची मुळात गुणात्मक नावे होती. परंतु ख्रिस्ती धर्माची त्रिमूर्ती निराकार ईश्वराची गुणवाचक नावे नसून स्वतंत्र अस्तित्व राखून आहेत. येशूला ईश्वरपुत्राच्या रूपातील कल्पना पौराणिक हिंदू धर्माच्या अवतारवादाच्या कल्पनेसमान आहे. याच कल्पनेमुळे आणि विश्वासाने ख्रिस्ती धर्म एकेश्वरत्वापासून भरकटत गेला आणि त्याच्या परिणामस्वरुप हिंदू धर्माचे अंधविश्वास आणि मूर्तिपूजेतील दोष त्यात सामील झाले. कालांतराने मेरी (मरयम) ची पूजा होऊ लागली आणि केवळ येशूवर विश्वास, पश्चात्ताप करण्यावर अधिक जोर तसेच मृत्यूअगोदर पादरीसमोर पापाची स्वीकृती मोक्षासाठी पर्याप्त

मान्यता पावते. पौराणिक हिंदू धर्माप्रमाणे ख्रिस्ती धर्मात ईश्वराला गौणत्व बहाल करण्यात आले. ख्रिस्ती धर्मात नैतिकतेसाठी अत्यंत कमी योगदान आहे. युरोप आणि अमेरिकेत दारूचे व्यसन, जुगार आणि व्यभिचार शिगेला पोहचला आहे. (आता तर समलैंगिक यौवन संबंध आणि समलैंगिक विवाह करण्यास मान्यता देण्यात आली आहे.) अफ्रिकेत काळया गोऱ्यांचा भेदभाव आणि गोऱ्या ख्रिश्चनांचा काळ्या ख्रिश्चनांवर अत्याचार हिंदूंचे शूद्रांवरील अत्याचारासारखेच आहेत. स्पष्ट आहे की, हिंदू धर्मासारखे ख्रिस्ती धर्मात समाजवादी दृष्टिकोन, समानता, विश्वबंधुत्वाची भावना उत्पन्न करण्याची क्षमता आणि शक्ती राहिली नाही. ईश्वराने पूर्वीच्या धर्मातील दोष समाप्त करण्यासाठी आणि मानवतेच्या कल्याणासाठी ईशदूत प्रेषित मुहम्मद (स.) यांना पृथ्वीवर पाठविले आहे, कारण कुरआनच्या अंतिम ईशआदेशांद्वारा जगातील समस्त दुराचार आणि कमतरतेला कायमचेच नष्ट करावे. (प्रेषित मुहम्मद (स.) अंतिम ईशदूत आणि अंतिम प्रेषित आहेत.)

# इस्लाम धर्म

इस्लामच्या मूल्यांकनासाठी प्रथमतः आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तिमत्त्वाचे मूल्यांकन आवश्यक आहे. प्रेषितांद्वारा ईशनिर्देश कुरआनद्वारा अंतिम रूपात प्रकट झाले. राम, बुद्ध आणि महावीर यांच्यासारखा मुहम्मद (स.) यांचा जन्म राजघराण्यात झाला नव्हता. त्यांचे जन्मानंतर उत्सव साजरे केले गेले नाहीत की त्यांचे पालनपोषण सुखासमाधानातसुद्धा झाले नाही. त्यांच्या शिक्षण-प्रशिक्षणाचीसुद्धा व्यवस्था होऊ शकली नव्हती. ते गर्भावस्थेतच होते की त्यांच्या पित्याचा देहान्त झाला. ते ६ वर्षाचे असताना त्यांच्या आईचा मृत्यू झाला, तसेच आठ वर्षाचे झाल्यानंतर आजोबांचा मृत्यू झाला. केवळ त्यांचे एक चुलते अबू तालिब यांनी त्या अनाथ बालकाप्रती सहानुभूती आणि दया दाखविली. या अनाथ बालकाला त्याच्या बाल्यावस्थेत शिक्षणापासून वंचित राहावे लागले. त्यांनी आपल्या आयुष्याच्या चाळीस वर्षांपर्यंत तत्कालीन समाजात एक प्रामाणिक, सदाचारी आणि सत्यजीवन व्यतीत केले. त्यामुळे त्यांना 'अमीन' (विश्वासू) म्हणून सर्वमान्यता प्राप्त झाली. बाल्यावस्थेपासून प्रेषित्व मिळेपर्यंत आणि त्यानंतरसुद्धा इस्लामला जगात पूर्णरूपेन स्थापित केल्यानंतर परलोकवास होईपर्यंत ते अशिक्षित राहिले. चाळीसाव्या वर्षी त्यांना ईशज्ञान प्राप्त झाले. सर्वप्रथम त्यांची पत्नी खदीजा (रजि.) आणि नंतर त्यांचे चुलत भाऊ नवयुवक अली (रजि.), दास (गुलाम) जैद (रजि.) आणि मित्र अबू बकर (रजि.) यांनी प्रेषितांच्या प्रेरणेने इस्लाम स्वीकारले. याचबरोबर विरोधक, विधर्मी त्यांचे कट्टर विरोधी बनले. त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढतच गेली. तेव्हा तत्कालीन राज्यसत्ता आणि नाना प्रकारच्या प्रलोभनापासून स्वतःला त्यांनी बाजूला ठेवले. म्हणून त्यांचे आणि त्यांच्या अनुयायांचे अतोनात हाल केले गेले. विरोधकांच्या घोर अत्याचारांमुळे त्यांच्या काही अनुयायांना स्वदेशत्याग करून हब्श (इथोपिया) मध्ये जावे लागले. येथेसुद्धा त्यांचे शत्रू कुरैश लोकांनी त्यांचा पाठलाग केला.

(अरबांचा एक प्रतिष्ठित आणि प्रसिद्ध कबिला (घराणे) कुरैशचा होता. अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) याच कबिल्यात जन्माला आले. अरबाच्या सर्व खानदानांत आणि घराण्यांत या कुरैश घराण्याची सामाजिक महत्ता आणि बहुदेववादी धार्मिक प्रभुत्वासाठी तसेच बहुदेवासाठी, धार्मिक प्रभुत्व टिकविण्यासाठी इस्लाम (एकेश्वरत्व) ला त्यांनी मोठा धोका समजून बसले. याचमुळे या घराण्याने सर्वांत जास्त इस्लामचा विरोध केला आणि दुसऱ्या टोळ्यांशी आणि खानदानांशी आपल्याबरोबर एकजूट केली.) तिथेसुद्धा शत्रूने (कुरैश) त्यांचा पाठलाग सुरूच ठेवला. तेथील शासक इस्लामच्या खरेपणाने प्रभावित झाला आणि मुस्लिम शरणार्थींना कुरैशच्या हवाली करण्यास नकार दिला. (इथोपिया (हब्श) च्या शासकाला 'नज्जाशी' ची उपाधी प्रसिद्ध आहे. त्याचा धर्म ख्रिस्ती

धर्म होता.)

येथे मक्का शहरात प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांचे अनुयायांवर घोर अत्याचार होऊ लागले. विरोधकांनी त्यांच्यावर अनन्वित अत्याचार केले. विरोधकांनी प्रेषितांचे प्राण घेण्याचे षड्यंत्रसुद्धा रचले. ईशप्रेरणेमुळे त्यांना मक्केहून मदीनेला प्रयाण करावे लागले. या घटनेला इस्लामी भाषेत 'हिजरत' म्हणतात, अर्थात धर्मासाठी देशत्याग करणे. परंतु मदीनेतसुद्धा कुरैशांनी त्यांना चैन पडू दिली नाही आणि मदीनेवर सशस्त्र आक्रमण केले. कुरआनमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) आणि मुस्लिमांना प्रतिरक्षणात्मक युद्ध (जिहाद) करण्याची अनुमती दिली गेली. शेवटी अत्यंत अल्पावधीत म्हणजे हिजरतनंतर नऊ वर्षांच्या आत संपूर्ण अरब देशावर इस्लामचे अधिपत्य झाले. दुसऱ्या शब्दांत त्या अरब टोळ्या ज्या सामुदायिकरीत्या सर्व प्रकारच्या वाईट कामांत त्या काळी लिप्त होत्या, जसे अशिक्षितपणा, अंधविश्वास, जुगार, चोरी-डकैती, व्यभिचार तसेच पित्याच्या निधनानंतर सावत्र आईशी विवाह करणे, मदिरापान, कन्यावध, भांडणतंटे, धोकेबाजी, गुलामावर अत्याचार, स्त्रियांशी दुर्व्यवहार, अनाथांचा हक्क मारणे, मूर्तिपूजा इ. अनेक प्रकारचे अत्याचार करणारा लोकसमुदाय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याच जीवनकाळात इस्लामप्रचाराच्या फलस्वरूप, वीस वर्षांच्या अल्प कालावधीत एकेश्वरवादी तसेच धार्मिक अनुयायांचा संघ बनला. इतर धर्मातील पुस्तकांमध्ये अशा भ्रष्ट आणि पापीजनांना राक्षस हे नाव देऊन एखाद्या देवता अथवा अवतराच्या माध्यमाद्वारे वध आणि नाश दाखविला गेला असता. परंतु या अद्वितीय ऐतिहासिक चमत्कारामध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्या पापी लोकांचा नाश केला नाही, तर पाप आणि पापी वृत्तीचा नाश केला. अशा प्रकारे ''दुराचारीची घृणा करू नका, तर त्याच्या दुराचाराची घृणा करा'' या म्हणीला इस्लामद्वारा प्रेषितांनी साकार करून दाखविले. थोडक्यात दीर्घ स्थायी अपराधी प्रवृत्तीरूपी रोगाने ग्रस्त अरब लोक अल्पकाळात स्वस्थ बनले. सामूहिक अपराध प्रवृत्तीरूपी रोगाचे प्रेषितांनी अचूक आणि सफलतापूर्वक निदान केले. याला ऐतिहासिक चमत्कारच म्हटले गेले पाहिजे की, अरब लोकांचा हा जटील रोग त्यांच्यातूनच निर्माण झालेल्या वैद्याने समूळ नष्ट केला. हा रोग या अपराधप्रवृत्त लोकांत फैलावला, परंतु मन, वाचा आणि कर्माने मात्र त्या लोकांच्या सहज प्रवृत्तीविरुद्ध होता. स्पष्ट आहे की, इस्लाम नैतिकतेची तेजवर्धक औषधी आहे. ही तेजवर्धक औषधी अशा प्रकारच्या रोगाने ग्रस्त जगातील इतर कोणत्याही लोकसमूहाचा त्वरित आणि सफल उपाय करण्यासाठी एक प्रयुक्त आणि सर्वसत्व संरक्षित औषधीच्या रूपात सक्षम आणि समर्थ आहे. इस्लामपूर्व अरब लोकांचा इस्लामद्वारा जो कायाकल्प झाला, तो त्यांचा ऐतिहासिक पुनर्जन्म आहे. तसे पाहाता पुनर्जन्माची कल्पना निव्वळ कल्पनाच आहे. सर्वांत महान आश्चर्य हे आहे की, प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या

नेतृत्वात मक्का विजयाप्रसंगी एकाही व्यक्तीचा जीव घेण्यात आला नाही आणि प्रेषित व त्यांच्या अनुयायीं समाजाने आपल्या शत्रूच्या कुकर्माचा बदला न घेता त्या सर्वांना सार्वत्रिक माफी दिली. इतिहासामध्ये युद्धानंतर विजयी पक्ष पराजयी पक्षाला सार्वत्रिक क्षमादान देतो, असे उदाहरण सापडत नाही. याविपरीत अन्य धार्मिक पुराण व गाथांमध्ये अवतार आणि देवीदेवतांद्वारा विरोधकांचा रोमांचकारी संहार मात्र वर्णित झालेला दिसून येतो. इस्लामच्या शुद्ध प्रकाशात परिपूर्ण होऊन अरब लोक स्वत: अंधकारातून बाहेर पडले नाहीत, तर त्यांनी एका शतकाच्या आत विद्युतगतीने जगाला इस्लामच्या प्रकाशाने उजळून टाकले. प्रेषित मुहम्मद (स.) मध्ये सधन स्त्रीशी (विधवा) विवाह केल्यानंतर मुळीच फरक पडला नाही की, प्रेषित्व बहाल झाल्यानंतर आणि अरब देशाचे सर्वेसर्वा बनल्यानंतरसुद्धा काहीएक फरक पडला नाही. त्यांनी आपले पूर्ण जीवन साधेपणाने व्यतीत केले. सर्व जातीधर्माच्या लोकांसाठी ते उपकारक होते. ते अत्यंत दानशूर होते. स्वत: कर्ज घेऊन इतरांच्या गरजा भागवित असत. त्यांच्यात नैतिक दोष नव्हता. ते साक्षात सत्यता, प्रामाणिकपणा, पावित्र्य, दया, सौजन्य व शांतीचे दूत होते आणि उदारता व दयाशीलतेचे प्रतीक होते. त्यांनी फक्त दुसऱ्यांच्या भल्यासाठी आपले पूर्ण जीवन व्यतीत केले. त्यांची पुण्याई सर्वतोपरी असीम होती. श्रमाला प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी आणि समानता, विश्वबंधुत्व आणि सहयोगाची भावना जागृत करण्यासाठी त्यांनी युद्ध आणि शांतीच्या काळात असे कार्य कधीही केले नाही की लोक त्यांना प्रमुख समजतील. ते युद्धकाळात आणि शांतीच्या काळात अतिनम्र, उदार आणि क्षमाशील राहत. दैनंदिन जीवनव्यवहार पार पाडत असतानासुद्धा सतत ईशचिंतन करत असत आणि सर्वांसाठी येथपावेतो की विरोधकांसाठीसुद्धा ईश्वराजवळ कल्याणाची प्रार्थना करीत असत. रात्री उठून (ताहज्जूद) नमाज अदा करत. एके दिवशी भल्या रात्री आदरणीय माता आएशा (रजि.) यांना भ्रम झाला की, प्रेषित मुहम्मद (स.) दुसऱ्या पत्नींकडे गेले असावेत. परंतु त्यांनी पाहिले की, ते पवित्र मस्तक ईश्वर आराधनेत भूमीवर नत झाले आहे. आएशा (रजि.) यांना त्या वेळी पश्चात्ताप झाला. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्वत:ला ईश्वरासाठी समर्पित केले होते आणि त्यांचा ईश्वरावर अतुट विश्वास होता. ते अत्यंत क्षुल्लक गोष्टीसाठीसुद्धा ईश्वराच्या भरोशावर राहत असत. अशा प्रकारे त्यांचे ईश्वरसमर्पित पवित्र जीवन वास्तविकपणे योग आणि वैराग्य होते. 'पाण्यात कमळपर्णा'सारखे त्यांचे जीवन होते. त्यांचे जीवन सत्यतपस्या होती. त्यांच्या प्रेषितत्वाचे प्रमाण त्यांना मिळालेली अपूर्व सफलता आणि इस्लाम धर्माची विश्वव्यापी प्रतिष्ठा आहे. हेसुद्धा प्रमाणित आहे की, प्रारंभी अशिक्षित असूनसुद्धा ईश्वराने त्यांना कुरआनरूपी ज्ञानाच्या मूळस्रोताने विभूषित केले. प्रेषित मुहम्मद (स.) आणि इस्लामची महत्ता आणि क्रांतिकारी प्रभावाची पुष्टी ऐतिहासिक प्रमाणांनीसुद्धा

होते. पूर्वग्रही आणि दूराग्रही उमर (जे नंतर माननीय उमर (रजि.) बनले आणि इस्लामचे दुसरे प्रभावशाली खलीफा बनले) तळपती तलवार घेऊन प्रेषित मुहम्मद (स.) यांना जीवे मारण्यासाठी घरातून निघाले होते. कुरआनच्या काही श्लोकांना (आयती) ऐकून त्वरित त्यांचे हृदयपरिवर्तन झाले आणि उमर (रजि.) यांनी प्रेषितांपुढे इस्लाम स्वीकारला. हीच स्थिती तुफैल बिन उमर यांची झाली होती. हे महाशय प्रेषित मुहम्मद (स.) यांची मार्गदर्शनपर वाणी आपल्या कानात प्रवेशकर्ती होऊ नये म्हणून कानात कापसाचे बोळे कोंबत असत. एकदा प्रेषितांच्या मुखकमलातून कुरआनची काही वचने ऐकतात आणि त्वरित इस्लाम स्वीकारतात. स्वत: साधनहीन आणि अनाथ, अशिक्षित परंतु ईशज्ञानाने विभूषित आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) जीवनभर घोर अत्याचारांना सहन करीत करीत अत्याचारी लोकांच्या कल्याणासाठी प्रार्थना करत. अपरिहार्य परिस्थितीत ईशआदेशाने युद्ध करत असत. मक्का विजयप्राप्तीनंतर त्यांच्यावर आणि त्यांच्या अनुयायांवर ज्या मक्कावासीयांनी घोर अत्याचार केले होते, त्यांना सामूहिक क्षमादान दिले. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या जीवनकाळातच राक्षसी अरबांना पुण्यात्मा बनवून सोडले. यानंतर शतकाच्या आत इस्लाम जगातील अधिकतर भागावर प्रतिष्ठित झाला. आज इस्लाम सर्वांत जास्त लोकप्रिय विश्वव्यापी धर्म म्हणून पुढे आला आहे. याच कारणामुळे सिद्ध होते की, इस्लामची शक्ती स्वयंसिद्ध आहे. अत्याचार सहन करता करता धैर्याने ईशशक्तीद्वारा प्रगती करत घोर संघर्षानंतरसुद्धा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) सफल झाले. संघर्षातसुद्धा त्यांनी नैतिकतेचा लेशमात्र त्याग केला नाही. रामाने बालीचा वध करण्यासाठी झाडाच्या आडून बाण चालवून वध केला. तसेच रावणाचा वध करून त्याच्या बेंबीतील अमृताचे रहस्य जाणून घेण्यासाठी रावणाच्या भावाचा म्हणजे विभीषणाचा सहयोग घेऊन राजनीतीचा परिचय करून दिला. याचप्रमाणे कृष्णाने द्रोणाचार्यांच्या वधात अश्वत्थामा नामक हत्तीला मारून युधिष्ठीर जोरात 'नर' ओरडू लागला आणि हळूच 'हत्ती' म्हणू लागला. द्रोणाचार्य आपला पुत्र अश्वत्थामाच्या तथाकथित मृत्यूने घाबरून तो नि:शस्त्र असताना त्याचा वध करण्यात आला आणि अशा प्रकारे राजनीतीची ओळख करून देण्यात आली. याचप्रमाणे जयद्रथचा वध करण्यासाठी संध्याकाळ नव्हती, तर ती संध्याकाळ होण्याचे मायाजाळ रचून वध करण्यात आला आणि अशा मायाजाळपूर्ण राजनीतीचा परिचय देण्यात आला. दुसरीकडे याच्या अगदी विपरीत आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी बदरच्या लढाईत सैन्य अल्प प्रमाणात असतानासुद्धा दोन सैनिकांची सेवा स्वीकारण्यास नकार दिला होता. ते दोन सैनिक कळकळीची विनंती करत होते. त्यांनी विरोधकांना वचन दिले होते की, 'आम्ही प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या बाजूने लढणार नाही.' किती अद्‌भूत नैतिकता आहे प्रेषितांची! आदरणीय प्रेषित मुहम्मद

(स.) हे, 'चांगल्या व साध्यासाठी चांगले साधन' या सिद्धान्ताचे प्रतीक होते. (इस्लामी सैन्याची बदरच्या लढाईच्या वेळी एकूण संख्या ३१३ होती, तर शत्रूसैनिक १००० होते. इस्लामी सैन्यात हत्यारे आणि सामारिक साधनांचा अभाव होता. परंतु दुसरीकडे शत्रूसैन्य सामरिक साधनांनी सुसज्ज होते.) मक्का विजयानंतर त्यांनी त्या अत्याचारीलासुद्धा क्षमादान केले ज्याने त्यांच्या कन्येला उंटावरून खाली ढकलून जखमी केले होते आणि अतिकष्ट दिले होते. इतिहास अशा प्रकारच्या क्षमाशीलतेचे दुसरे उदाहरण प्रस्तुत करू शकत नाही. नि:संदेह आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) ईशदूतांमध्ये सर्वश्रेष्ठ आहेत. इस्लाम आपल्या नावानेच महत्त्वपूर्ण आणि अर्थपूर्ण आहे. इस्लामचा शाब्दिक अर्थ ''ईशइच्छेपुढे पूर्णरूपेन नतमस्तक होणे'' आहे. म्हणजेच ईश्वराचा पूर्ण रूपाने आज्ञाकारी भक्त बनून जाणे. अशा प्रकारे इस्लाम एकेश्वरत्वाचा सूचक आहे. इस्लाम मोहमेडनीझम मुळीच नाही. (ख्रिस्ती जगताने दुराग्रहाने इस्लामच्या विश्वव्यापी व्यापकता आणि सार्वभौमीकतेला सीमित करण्यासाठी आणि ईशधर्म जो आदिकाळापासूनचा आहे त्याला सामयिक व्यक्तित्व 'मुहम्मद'पर्यंत सीमित करण्यासाठी 'मोहमडनीझम' ही पारिभाषिक शब्दावली प्रचलित केली होती. या दुराग्रहींना जगाला दाखवून द्यावयाचे होते की, इस्लाम जणू काही तर एक मानव आविष्कृत विचारधारा आहे. जसे प्रेषित इसा (ख्रिस्त) यांच्या धर्माला ख्रिस्ती धर्म हे नाव देऊन 'मानव-आविष्कृत धर्मा'च्या रूपात प्रसिद्ध आणि प्रचलित करून टाकले) इस्लाम ईशप्रदत्त आदि धर्म आहे. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हे अंतिम प्रेषित आहेत, हे इस्लाम या नावाने सिद्ध होते. याच्या विपरीत हिंदू धर्माचा कोणताच ठोस अर्थ निघत नाही. बौद्ध धम्म आणि ख्रिस्ती धर्म केवळ संस्थापकाच्या संबंधाला सूचित करतात, मात्र व्यापकतेचे दिग्दर्शन करत नाहीत. याच्या उलट इस्लाम जगात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या अगोदरच्या सर्व प्रेषितांचा आदर करतो. सर्व धर्म मूलत: एकच होते (मूळ धर्म प्रत्येक काळात प्रत्येक प्रेषिताद्वारा प्रचारित व प्रसारित इस्लाम (ईशआज्ञापालन) हाच राहिला आहे. हे शक्य आहे की, त्या काळी त्या भाषेत मूळ धर्माचे नाव काही वेगळे असेल. परंतु त्याचा मुळाधार एकेश्वरत्व, प्रेषित्त्व आणि परलोकत्त्व यावरच अवलबूंन होता आणि अल्लाहसमोर पूर्ण समर्पण हा अर्थ गर्भित होता.) कालांतराने जेव्हा धर्मात मिश्रण आणि हस्तक्षेप होऊ लागला आणि वास्तविक ईशशिकवणीपासून लोक भटकले तेव्हा ईश्वराने अंतिम रूपात प्रेषित मुहम्मद (स.) द्वारा कुरआन अवतरित केले. ''अल्लाहशिवाय कुणी दुसरा ईश्वर नाही आणि मुहम्मद (स.) अल्लाहचे प्रेषित आहेत'' हा इस्लामचा कलमा (मूळमंत्र) आहे. इस्लामची पाच मूलभूत तत्त्वे आहेत.

१) 'तौहीद' म्हणजे एकेश्वरत्व, २) 'नमाज' अर्थात शारीरिक उपासना अथवा प्रार्थना, ३) 'जकात' अर्थात अनिवार्य धर्मदान, ४) 'रोजा' अथवा वर्षातून रमजान

महिन्याचे पूर्ण उपवास, ५) 'हज' अर्थात काबागृहाची तीर्थयात्रा.

बौद्ध धम्म अनिश्वरवादी असल्याने एकेश्वरत्वास त्या धर्मात काहीएक स्थान नाही. तसेच अध्यादेशाच्या स्वरुपात त्या धर्मात काहीएक नियम घालून दिलेले नाही. काही नैतिक नियम आलेले दिसतात. हीच अवस्था ख्रिश्चन धर्माची आहे. ईश्वराच्या पुत्राच्या रूपात ख्रिस्ताला त्या धर्मात मान्यता असल्याने एकेश्वरत्व त्या धर्मात खंडित झालेला आहे. इस्लामचे वरील पाचही मूलतत्त्वे मात्र प्राचीन हिंदू धर्मात आढळून येतात. संबंधित असलेले नियम विखुरलेले आहे, तसेच अत्यंत कठीण बनवून टाकलेले आहेत. त्यामुळे ते आज मूळ स्वरुपात दिसून येत नाहीत. इस्लाममध्ये या नियमांचे संक्षिप्तीकरण, नियमितीकरण, सरलीकरण झालेले आहे. तसेच विशेष परिस्थितीत सूटसुद्धा दिलेली आहे. परंतु हिंदू धर्मात मात्र या पाचही तत्त्वांचे फक्त वैयक्तिक अंग अबाधित ठेवले गेले आहे. परंतु दुसरीकडे इस्लाममध्ये या अध्यादेशांना सामाजिक आवरण प्रदान केलेले दिसून येते. अशा प्रकारे इस्लाम धर्मात ही शुद्ध तत्त्वे धर्माला सरलता, सर्वग्राह्यता, सार्वभौमिकता आणि समाजवादी दृष्टिकोन प्रदान करून सर्वोत्कृष्ट धर्माच्या रूपात प्रतिष्ठित करताना दिसतात. प्राचीनतम वैदिक साहित्याने मानवी सभ्यतेच्या प्रारंभीच एकेश्वरत्वाची घोषणा 'एकमेव, द्वितीयो नास्ति'च्या रूपात दिली होती, म्हणजेच ईश्वर एक आहे आणि दुसरा कुणीही नाही. कृष्णाच्या गीतेत ईश्वराला 'जोतिषाम पितज्योति' म्हणजेच प्रकाशाचा प्रकाश म्हटले गेले आहे. ईश्वराचे हे वैशिष्ट्य तेच आहे जे कुरआनमध्ये 'नुरुल आलानूर' (२४:३५) संबोधले गेले आहे. उपनिषदांमध्ये अनेक वेळा सांगितले गेले आहे की, 'तमसो मा ज्योतिर्गमय' म्हणजेच आम्हाला अंधकारातून प्रकाशात घेऊन जा. प्रेषितांचीसुद्धा हीच विशेष प्रार्थना होती. (''हे अल्लाह, माझ्या मनाला प्रकाशमय कर आणि माझे कान आणि डोळे प्रकाशमय कर आणि माझ्या डाव्या आणि उजव्या बाजूलासुद्धा प्रकाशमय कर आणि माझ्या मागे पुढेसुद्धा प्रकाशमय कर. तसेच माझ्या खाली आणि वर प्रकाशमय कर आणि प्रलयाच्या दिवशी माझ्या प्रकाशात खूप वृद्धी कर. आमीन!'') हदीसप्रमाणे ईश्वराला गीतेमध्ये 'विश्वतोमुखम' म्हटले गेले आहे. म्हणजेच ईश्वराचे चहूबाजूला अस्तित्व आहे. कुरआनमध्येसुद्धा सांगितले गेले आहे की, ''कुठेही तुम्ही पाहाल तिथे तुम्ही अल्लाहला पाहाल.'' (२:११५) गीता ईश्वराला 'सर्व लोक महेश्वरम' घोषित करीत आहे. म्हणजेच ईश्वर सर्व लोकांचा मालक आहे. कुरआनमध्ये हेच शब्द ईश्वरासाठी 'रब्बुल आलमीन' (१:१) आले आहेत. गीतेमध्ये ईश्वराला 'सत्य' म्हटले गेले आहे. कुरआनमध्येसुद्धा ईश्वराला 'हक़' (१२२:६२) म्हटले आहे. अशा प्रकारे गीता आणि कुरआन दोहोंमध्ये ईश्वरासंबंधी घोषित केलेले आहे की, ईश्वरासमान कोणीही नाही. (४२:११) गीता आणि उपनिषदांमध्ये म्हटले गेले आहे की, सर्व ब्रह्मांड

ईश्वराने व्यापले गेले आहे. त्याच प्रकारे कुरआनची स्पष्टोक्ती आहे की, ''अल्लाह सर्वांना व्यापून आहे.'' (४:१२६) गीतेमध्ये ईश्वराला 'अक्षर' म्हणजेच कधीही नष्ट न होणारा म्हटले आहे आणि इतर सर्वांना नष्ट होणारे म्हटले गेले आहे. अर्थात 'क्षर'. याच प्रकारे कुरआनची स्पष्टोक्ती आहे की, ''सर्व नाशवंत आहे, बाकी राहणारे फक्त अल्लाहचे अस्तित्व आहे.'' (५५:२६) गीतेमध्ये ईश्वराला 'अचिंत' आणि 'अनिर्वचनीय' म्हटले आहे. म्हणजेच बुद्धीपलीकडचे आणि अवर्णनीय असे अस्तित्व. कुरआनमध्येसुद्धा ईश्वराविषयी म्हटले गेले आहे की, त्याच्यासारखे काहीच नाही. मनुष्याची दृष्टी त्याला पाहू शकत नाही की समजू शकत नाही.'' (६:१०३)

इतिहासानुसार, वैदिक साहित्य गीता आणि तत्कालीन अरबी धार्मिक विचार आणि मान्यतांचा अजिबात संबंध नव्हता. ऐतिहासिक घटकांच्या प्रकाशात गीता आणि कुरआनची साम्यता फक्त एकेश्वरत्वापर्यंतच मर्यादित नाही, तर गीतेतील धर्मयुद्ध आणि कुरआनचा जिहाद यासाठी समांतर आधार आहेत. तसेच त्यासाठीची समान परिस्थिती व प्रेरक आणि उद्‌बोधक निर्देश, गीतेला आदरणीय मुहम्मद (स.) हे प्रेषित असण्याची प्रखर साक्षी आहेत. दुसऱ्या प्रकारचा अध्यादेश म्हणजे नमाज होय. या उपासना आणि प्रार्थनेचे महत्त्व विशाल हिंदू साहित्यात वर्णित आहे, परंतु ह्या उपासनेला नमाजला इस्लामने एकरूपता, सामाजिक दृष्टिकोन आणि नियमितता प्रदान करून त्यास अत्यंत प्रभावी उपासना पद्धत बनविले आहे. हिंदू धर्मात दान करण्याला अत्यंत महत्त्व दिले गेले आहे. परंतु दान घेण्यास पात्र फक्त ब्राह्मणालाच ठरविले गेले आहे. परंतु इस्लामने जकातला अनिवार्य ठरवून जकातला घेण्याला पात्र निर्धन लोकांना ठरविले आहे. समाजवादाचा पाया अशा प्रकारे इस्लामने जकातच्या व्यवस्थेच्या रुपाने घालून दिला आहे. इस्लामचे हे अनिवार्य दान वैशिष्ट्यपूर्ण आहे. उपवासा (व्रत) चे महत्त्वसुद्धा हिंदू धर्मात अधिक आहे. येथे चांद्रायण असावे. हे एक महिन्याचे चंद्रकलानुसार सुरू होते. चंद्रकलानुसार समाप्त होते. इस्लाममधील रोजा आणि चांद्रायण व्रत समान आहेत. परंतु हे चांद्रायण व्रत आता लुप्त झाले आहे. अद्याप हिंदू धर्मात निर्जला एकादशी आणि इतर अनेक व्रत आहेत. परंतु हे व्रत अनेकविध अवसरानुरुप आणि तेसुद्धा स्त्रीवर्गाशी मर्यादित होऊन बसले आहेत. या उलट इस्लाममध्ये रोजाची अनिवार्यता स्त्री आणि पुरुष सर्वांसाठी आहे. रोजाची एकरूपता, सुनिश्चितता, सार्वभौमिकता आणि त्याचा इतर अध्यादेशांशी संबंध वाखाणण्यासारखा आहे. इस्लाममध्ये 'रोजा'चे सामाजिक महत्त्व आहे, परंतु हिंदू धर्मात व्रत वैयक्तिक स्तरापुरते आहे. रोजा समाप्तीनंतर विशाल सामूहिक नमाज आणि परस्पर अभिवादन समता आणि विश्वबंधुत्वाचा उत्कृष्ट नमुना आहे. तीर्थाचे प्रतिरुप हजयात्रा आहे. हिंदूंची अनेक तीर्थे आहेत ज्यांचा संबंध फक्त भावनेशी आणि श्रद्धेशी आहे,

पौराणिक कल्पनेशी आहे. परंतु इस्लामचे हज एकरूपता, गंभीरता आणि धार्मिकतेसह ऐतिहासिक महत्त्व राखून आहे. थोडक्यात इस्लामचे हे पाचही अध्यादेश हिंदू धर्मात बीजरूपी आहेत. हिंदू धर्म प्राचीनतम धर्म असल्याने प्रेषित शृंखलेतील अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांची ज्वलंत साक्ष आहे. इस्लामने या अध्यादेशांना सार्थक आणि प्रभावशाली बनविले. समाजोपयोगी आणि आश्चर्यजनक रूपात समाजाला फलदायी ठरेल असे प्रभावशाली आणि सार्थक सिद्ध केले. सर्वात महत्त्वाची आणि सुखद गोष्ट ही आहे की, इस्लाममध्ये एकेश्वरत्वाला सोडून अन्य चार अध्यादेशांना अनन्यसाधारण परिस्थितीत सूट देण्यात आली आहे. एकेश्वरत्व मन, बुद्धी आणि आत्म्याशी संबंधित आहे. ते सर्वशक्तिमान अल्लाहवर निष्ठा ठेवणे आहे. या निष्ठेत सूटचा प्रश्नच उद्‌भवत नाही. यात सवलत देणे म्हणजे ईशद्रोह आहे. इतर धर्मांत एकेश्वरत्वामध्ये सूट आणि संशोधनच्या कारणांनी भ्रष्टता आली. इस्लाम प्रत्येक ईशद्रोहाला ईशद्रोह समजतो. इस्लामने एकेश्वरत्वाला सर्वस्वी सुरक्षित ठेवले आहे आणि हेच इस्लामचे खास वैशिष्ट्य आहे. तसे पाहाता इस्लाममध्ये जकात, रोजा आणि हजसाठी विशेष परिस्थितीमध्ये म्हणजे शारीरिक अशक्तता, आजारपण आणि आर्थिक दुःस्थितीत सूट दिली गेली आहे. उदाहरणार्थ, दान सर्व असमर्थांसाठी विकल्प ठेवण्यात आला आहे की, तो भांडणतंटे आणि उपद्रवापासून दूर राहणे, म्हणजेच त्याची 'जकात' (दान) आहे. इस्लामचे हे सरल, संक्षिप्त नियम सर्वसामान्य लोकांसाठी तसेच सर्वांसाठी उपयुक्त आणि फलदायी आहेत. एकेश्वरत्वाला सोडून शारीरिक आणि आर्थिक कष्टमय परिस्थितीत जकात, रोजा आणि हजमध्ये सूट दिल्याने इस्लाम निर्धनांसाठी, अपंगांसाठी, रोगी लोकांसाठी वरदान ठरला आहे. परंतु अन्य धर्मांत, निर्धन, अपंग आणि रोगी लोक सर्वथा अपमानित आणि उपेक्षित आहेत. इस्लामने धर्मातील खर्चिक कर्मकांडांचे सर्वथा निराकरण केले आहे. इस्लाम आपल्या व्यावहारिक नियमांनी तसेच अन्य नैतिक तथा सामाजिक सहाय्यक नियमांच्या समन्वयाने स्थायी आणि सार्वभौम आधारावर सर्वांचा धर्म, समस्त मानवतेचा धर्म सिद्ध झाला आहे. या मानवता धर्मात (इस्लाम) स्त्री, पुरुष, तिरस्कृत अनाथ, दास, निर्धन, अपंग व्यक्ती, कुटुंब, समुदाय आणि राष्ट्र सर्वांचा समावेश आहे. सारांशतः, त्या सर्व मानवी समस्यांना तोंड देण्याचे सामर्थ्य इस्लाममध्ये असल्याने मानवतेचा कल्याणकारी धर्म म्हणून पुढे आला आहे. इस्लामची प्रमुख वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत.

१) इस्लामचे सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्याचे विशुद्ध एकेश्वरत्व आहे. हिंदू धर्माच्या ईश्वरकृत वेदांचे एकेश्वरत्व कालांतराने बहुदेववाद (अनेकेश्वरत्व) मध्ये लुप्त होऊन बसला असे नाही, तर अनेकेश्वरत्व आणि अवतारवादानंतर ईश्वराला गौणत्व बहाल करण्यात आले आहे. याचप्रमाणे ख्रिस्ती धर्मातसुद्धा ईश्वराला मुख्य स्थान न देता

गौणत्व देण्यात आलेले आहे. या विपरीत इस्लामच्या एकेश्वरत्वात कोणत्याच प्रकारचे परिवर्तन आणि विकार उत्पन्न झालेला दिसून येत नाही. एकेश्वरत्वाचा पाया इस्लाममध्ये इतका सुदृढ आहे की, यात भेसळ करणे अशक्य आहे. याचे एकमेव कारण इस्लामचा आधारभूत आणि मूलमंत्र (कलमा) आहे. ''मी स्वीकार करतो की अल्लाहशिवाय कोणी दुसरा ईश्वर व उपास्य नाही आणि मुहम्मद (स.) ईश्वराचे दास व प्रेषित आहेत.'' प्रेषित मुहम्मद (स.) यांना ईश्वराने कुरआनमध्ये अधिकांश वेळा 'अब्द' म्हटले आहे ज्याचा अर्थ आज्ञाकारी आणि दास असा होतो. म्हणूनच ईश्वराचा दास ईश्वराचा अवतार होऊ शकत नाही की उपास्यही होऊ शकत नाही.

२) इस्लामने मदिरेला (दारु) पापांची जननी म्हटले आहे. म्हणून इस्लाममध्ये दारू सेवनाचा निषेध फक्त नैतिक पातळीवरच केला नाही, तर ते एक घोर अपराधिक कृत्य आहे. इस्लाममध्ये दारु सेवन दंडनीय अपराध असल्याने दारुड्याला चाबकाने मारण्याची शिक्षा दिली गेली आहे. इस्लाममध्ये सैद्धान्तिकरीत्या ताडी, भांग इ. सर्व मादक द्रव्यें निषिद्ध आहेत. परंतु हिंदू धर्मात याची मनाईसुद्धा आहे आणि परवानगीसुद्धा आहे असे दिसून येते. विष्णुचे उपासक मदिरेला निषिद्ध मानतात, तर कालिकेचे उपासक, शैवजन शिव देवता भांगेचे सेवनकर्ता दाखविल्याने शैवामध्ये व्यसनांना बंदी आहे.

३) जकात अर्थात अनिवार्य दान हे श्रेय केवळ इस्लाम धर्मातच आहे. इस्लामचे आधारस्तंभ ईमान (श्रद्धा), नमाज (उपासना), रोजा (व्रत), हज (काबागृहाची तीर्थयात्रा) आणि जकात (दान) आहेत. या जकातला प्राप्त करण्याचे अधिकारी निर्धन आणि कर्जबाजारी लोकसुद्धा आहेत, जे कर्ज परत करण्यास असमर्थ आहेत. तसेच बेरोजगार लोकसुद्धा याचे हक्कदार (अधिकारी) आहेत. अशा प्रकारे श्रीमतांच्या संपत्तीमध्ये इस्लामने गरिबांचा हक्क राखून ठेवला आहे. जकात घेण्याला जे पात्र आहेत असे लोक भिक्षुक बनून श्रीमंतांजवळ जाणे जरूरीचे नाही. इस्लामी शासनाचे हे मूलभूत कर्तव्य आहे की, श्रीमंतांकडून त्यांनी जकात वसूल करावी आणि ती पात्र लोकांना देण्याची व्यवस्था करावी. निर्धन लोकांविषयी अशा प्रकारची चिंता आणि निर्धनांचा असा आदर कोणत्याच दुसऱ्या धर्मात आढळून येत नाही.

४) इस्लाममध्ये हर प्रकारचा जुगार निषिद्ध आहे. परंतु हिंदू धर्मात दीपावलीत जुगार खेळणे हे धार्मिक कृत्य समजले जाते. ख्रिस्ती धर्मातसुद्धा जुगारावर काहीएक प्रतिबंध घातलेला नाही.

५) व्याज एक अशी व्यवस्था आहे की, त्यात धनवान (श्रीमंत) आणखी श्रीमंत बनत जातो आणि गरीब अतिगरीब बनत जातो. समाजाला या अध:पतनापासून सुरक्षित ठेवण्यासाठी इतर कोणत्याच धर्मात व्याजावर निर्बंध घातलेले दिसत नाहीत. इस्लाम फक्त असा एकमेव

धर्म आहे ज्याने व्याजाला अतिवर्जित ठरविले आहे. व्याजाला निषिद्ध घोषित करताना कुरआनमध्ये राहिलेल्या बाकी व्याजाला सोडून देण्याची आज्ञा दिली गेली आणि न सोडल्यास अल्लाह आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशी युद्धाची धमकी देण्यात आली आहे. कुरआनमध्ये स्पष्टोक्ती आहे,

''हे श्रद्धावंतानो, अल्लाहचे भय बाळगा आणि जे काही तुमचे व्याज लोकांकडून येणे बाकी असेल ते सोडून द्या, जर खरोखर तुम्ही श्रद्धावंत असाल. परंतु जर तुम्ही असे केले नाही, तर सावध व्हा. अल्लाह व त्याच्या प्रेषिताकडून तुमच्याविरुद्ध युद्धाची घोषणा आहे.''

(२:२७९)

६) इस्लामला हे श्रेय प्राप्त आहे की, त्याने धार्मिकतेने लाचखोरीला निषिद्ध ठरविले आहे. कुरआनची स्पष्टोक्ती आहे,

''आणि तुम्ही आपापसामध्ये एक दुसऱ्याची संपत्ती अवैधपणे गिळंकृत करू नका किंवा आपल्या अधिकाऱ्यांपुढे ती या हेतूने सादर करू नका की तुम्हाला त्या संपत्तीतील काही भाग हेतुपुरस्पर हकनाक खाण्याची संधी मिळेल.'' (२:१८८)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी लाच देणाऱ्या आणि घेणाऱ्यांवर अल्लाहचा धिक्कार केला आहे.

७) सर्वप्रथम इस्लामने स्त्रीजातीला संपत्तीचा अधिकार प्रदान केला. इस्लामने मृतकांच्या संपत्तीतसुद्धा स्त्रियांना त्यांचा हिस्सा दिला. (हे नियम निर्धारित केल्यानंतर कुरआन स्पष्ट करत आहे की, या अल्लाहच्या सीमारेषा आहेत. या सीमांचे उल्लंघन करणारा नरकाच्या आगीत फेकला जाईल, ज्यात तो सदैव राहील आणि ही घोर यातना आहे.) हिंदू धर्मात विधवा स्त्रीच्या पुनर्विवाहाचा नियम नाही. एवढेच नव्हे तर पतीमृत्यूनंतर विधवेला पतीच्या शवाबरोबर जीवित जाळण्याची प्रथा होती. जी स्त्री सती जात नव्हती तिला सर्व प्रकारच्या मानवी हक्कांपासून वंचित ठेवले जाई. तिला चांगले भोजन, चांगले वस्त्र, चांगल्या राहणीमानापासून दूर ठेवले जात असे. विधवा समाजात तिरस्कृत होती, आणि तिचे जीवन भारस्वरूप बनून राहत असे. याविरुद्ध इस्लाममध्ये विधवेसाठी असे कठोर नियम नाहीत. पतीच्या मृत्यूनंतर चार महिने आणि दहा दिवसांनंतर ती आपला दुसरा विवाह करण्यास स्वतंत्र असते.

८) इस्लामनेच फक्त स्त्रियांना अनिवार्य स्थितीत पतीत्याग करण्याचा अधिकार (खुला) बहाल केला आहे. हिंदू धर्मात स्त्रियांना हा अधिकार नाही. आमच्या देशात संविधानद्वारा स्त्रियांना आता बरेच अधिकार प्राप्त झाले आहेत.

९) एखाद्याने स्त्रीच्या शीलाबद्दल शंका घेतल्यास, आरोप करण्यारास चार साक्षीदार आणणे क्रमप्राप्त आहे. त्याला साक्षीदार ठेवण्याचा एकमेव इस्लाम धर्माने आदेश दिला

आहे. जर आरोप करणारा चार साक्षीदार उपस्थित करू शकला नाही तर त्याला ऐंशी फटके (कोडे) मारण्याची शिक्षा सुनावण्यात आली आहे. या संदर्भात श्रीराम आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या आचरणाचा तुलनात्मक विचार करू या. प्रेषित मुहम्मद (स.) यांची पत्नी आएशा (रजि.) यांच्या सतीत्वावर आरोप ठेवले गेले, तेव्हा प्रेषितांच्या आदेशाने नव्हे तर पूर्ण चौकशीअंती आरोप खोटा ठरला होता आणि आएशा (रजि.) निर्दोष असल्याचे सिद्ध झाले होते. परंतु श्रीरामने मात्र केवळ संशयावरून सीतादेवीचा त्याग केला. तेव्हा तिने अग्नीपरीक्षा देऊन आपले सतीत्व सिद्ध केले होते. जर हिंदूजन श्रीरामाच्या या आचरणाचे अनुकरण करू लागले तर किती निरपराध स्त्रियांना आपले जीवन समाप्त करावे लागेल. स्त्रियांनी इस्लामची कृतज्ञता व्यक्त केली पाहिजे. इस्लामने निर्दोष स्त्रियांवर दोषारोप करणे फक्त नैतिक अपराध नव्हे तर वैधानिक अपराधसुद्धा ठरविला आहे.

१०) इस्लामने कमी माप करणे आणि वजन कमी करणे यास वैधानिक अपराध ठरविले आहे. तसेच धार्मिक पापसुद्धा ठरविले आहे आणि परलोकातसुद्धा शिक्षा होणार हे निश्चित.

११) इस्लामने अनाथांची संपत्ती हडप करण्यास धार्मिक पाप ठरविले आहे. कुरआनची स्पष्टोक्ती आहे,

जे लोक अनाथांची मालमत्ता गिळंकृत करतात खऱ्याअर्थी ते आपले पोट आगीने भरतात आणि निश्चितच ते नरकाच्या भडकत असलेल्या आगीत झोकून दिले जातील. (४:१०)

अल्लाह तुम्हाला आदेश देतो की, अनाथासाठी न्यायावर दृढ राहा. (४:१२७)

१२) इस्लाम आदेश देतो की, तुम्ही अल्लाहवर प्रेम करता तर त्याच्या सृष्टीशी प्रेम करा.

१३) इस्लामनुसार, अल्लाह त्याच्यावर प्रेम करतो जो त्याच्या दासांची अधिकाधिक भलाई करतो.

१४) इस्लाम सांगतो की, जो प्राण्यांवर दया करतो, अल्लाह त्याच्यावर दया करतो.

१५) दया श्रद्धाशीलतेची निशाणी आहे.

१६) कुणाचीही श्रद्धा पूर्णत्वास पोचू शकत नाही जोपर्यंत तो आपल्या साथीदाराला आपल्यासमान समजत नाही.

१७) तोपर्यंत कोणीही व्यक्ती खऱ्या अर्थाने मुस्लिम सिद्ध होत नाही जोपर्यंत त्याने पोटभरून खावे आणि त्याचा शेजारीमात्र उपाशी झोपावा.

१८) इस्लामनुसार, इस्लामी राज्य अधर्माला विशेष परिस्थितीत आणि विशिष्ट सीमेपर्यंत

सहन करू शकते. परंतु अत्याचार आणि अन्यायाला मुळीच सहन करू शकत नाही.

१९) इस्लामनुसार, ज्या व्यक्तीचा शेजारी तिच्या दुराचारापासून सुरक्षित नसेल तर अशी व्यक्ती श्रद्धावंत ठरत नाही. (प्रेषित मुहम्मद (स.) यांनी शेजाऱ्यांबरोबर प्रत्येक स्थितीत सद्वर्तन करणे आवश्यक ठरविले आहे आणि मुस्लिम व मुस्लिमेतर यात फरक केलेला नाही. प्रेषितांचे वचन आहे, ''जिब्रिल (अ.) जे ईशआदेश घेऊन येत असत, ते सतत मला शेजारी लोकांशी चांगली वर्तणूक ठेवण्याचा आदेश देत.'' इस्लामी विद्वान इमाम इब्ने हजर यांनी खुलासा केला की, शेजाऱ्यांत मुस्लिम, मुस्लिमेतर अथवा मित्र, शत्रू सर्व सामील आहेत. याच प्रकारे दया आणि नम्रतेविषयीसुद्धा प्रेषितांनी अत्याधिक भर दिला. प्रेषित मुहम्मद (स.) यांचे वचन आहे की, ''मला धिक्कार करणारा अथवा शाप देणारा बनवून पाठविले गेलेले नाही, तर दयावान बनवून पाठविले गेले आहे.'' दयेला पात्र मुस्लिम, मुस्लिमेतर तथा समस्त प्राणीमात्र आहेत.)

२०) जी व्यक्ती, एखाद्याची एक इंच जमीन बळकावील तर अंतिम निवाड्याच्या दिवशी तिला सात गज पृथ्वीत धसविले जाईल.

२१) इस्लाममधील समता आणि बंधुत्वाची भावना अन्य धर्मांत सापडत नाही.

हिंदू धर्मात हरिजन घृणित आणि अपमानित समजले जातात. या भावनेविरुद्ध भारतात २५०० वर्षांपूर्वी महात्मा बुद्धाने आवाज उठविला, तेव्हापासून आजपर्यंत अनेक सुधारकांनी या भावनेला बदलण्याचा प्रयत्न केला. आधुनिक काळात महात्मा गांधी यांनी अथक प्रयत्न केले, तरीपण ते हिंदूंच्या या भावनेला बदलू शकले नाहीत. याचप्रकारे ख्रिस्ती धर्मात काळ्या आणि गोऱ्यांचा भेदभाव आहे. गोऱ्यांचे चर्च वेगळे आणि काळ्या ख्रिस्ती लोकांचे चर्च वेगळे असते. गोऱ्या ख्रिश्चनांच्या चर्चमध्ये काळ्यांना प्रवेश दिला जात नाही. दक्षिण अफ्रिकेत २१ व्या शतकातसुद्धा गोरे काळ्या ख्रिश्चनांवर अत्याचार करीतच आहेत. जगात चहूकडे समाजवादाचा डंका बाजवला जात आहे आणि संयुक्त राष्ट्रसंघ त्यासाठी कार्यरत आहे. या जातीभेद, रंगभेद इ. सर्व प्रकारच्या भेदभावांना इस्लामने मुळासकट नष्ट केले आहे. दक्षिण आफ्रिकेतील एखादा जुलू निग्रो मुस्लिम झाला तर त्वरित मुस्लिम समाजात त्याला समानतेची वागणूक मिळू लागते. परंतु ख्रिस्ती समाजात त्याला हे पद (समानतेचे) कधीही प्राप्त होत नाही. महात्मा गांधीनी इस्लामच्या या प्रेरक शक्तीविषयी हार्दिक उद्‌गार व्यक्त केले आहेत. (लेखक महोदयांनी संक्षिप्तपणे आपले म्हणणे मांडले आहे, जेणेकरून वाचक सहज सरलतापूर्वक आणि सर्वसाधारणपणे याविषयी अवगत व्हावेत. परंतु इस्लामच्या समता व विश्वबंधुत्वाविषयी आणखी प्रकाश टाकणे येथे संयुक्तिक ठरेल.)

इस्लाम मूळ रूपातच मानवतेला अभेद ठरवितो. इस्लाम ठामपणे सांगतो की, समस्त मानव एका आईवडिलांची संतती आहे. पवित्र कुरआनमध्ये अल्लाहने स्पष्ट आदेश दिला आहे,

''लोकहो! आम्ही तुम्हाला एका पुरुष व एका स्त्रीपासून निर्माण केले आणि मग तुमची राष्ट्रे आणि वंश बनविले जेणेकरून तुम्ही एकमेकांना ओळखावे. वास्तविकत: अल्लाहजवळ तुमच्यापैकी सर्वांत जास्त प्रतिष्ठित तो आहे जो तुमच्यापैकी सर्वांत जास्त ईशपरायण आहे. निश्चितच अल्लाह सर्व काही जाणणारा आणि खबर राखणारा आहे.''

(४९:१३)

वरील संकेतवचन अत्यंत अर्थपूर्ण आहे. यात तीन गोष्टी मुख्यत्वे स्पष्ट करण्यात आल्या आहेत, त्या समजून न घेतल्यामुळे मानवता देशादेशांत, जातीजातींत आणि वंशवंशांत विभागली गेली आहे. मनुष्य विसरून गेला आहे की तो एकाच मातापित्याची संतान आहे. मानवी इतिहास या कटुतेने, द्वेषाने आणि रक्तपाताने भरून गेलेला आहे. आज वर्तमानसुद्धा त्याची साक्ष देत आहे. जगात आज चहूकडे याच खोट्या भेदभावाचा परिणाम आपण पाहात आहोत. वरील संकेतवचनात मनुष्याला सर्वप्रथम याच वास्तविकतेशी परिचित करण्यात आले आहे की, ''तुम्ही आपापसांत भाऊ भाऊ आहात.'' दुसरी महत्त्वाची गोष्ट सांगितली आहे की, संतान, गोत्र, कुटुंब, जाती, वंश, देश या भेदभावाचा अर्थ हा नाही की त्यात कोणी श्रेष्ठ आणि इतर कोणी कनिष्ठ आहेत. समस्त मानव पृथ्वीच्या एकाच भागात सामावले गेले नसते. यामुळे वेगवेगळे देश बनले, गोत्र आणि कुटुंब निर्माण झाले, वंश आणि जाती बनल्या जेणेकरून तुम्ही एकदुसऱ्याला ओळखावे व एकदुसऱ्याचे हक्क ओळखावेत. तिसरी महत्त्वाची गोष्ट या संकेतवचनाद्वारे स्पष्ट होते की, वास्तविक श्रेष्ठतेचा आधार, देश, वंश, जाती, कुटुंब, वर्ण, संतान इ. नसून संयम, चारित्र्य आणि सदाचार आहे. जी व्यक्ती जास्त ईशपरायण आहे ती तुमच्यात प्रतिष्ठित आहे. संयमी, सच्चरित्र आणि सदाचारी तुमच्यापैकी श्रेष्ठ आहे, मग ती व्यक्ती कोणत्याही देशाची, जातीची, वंशाची, वर्णाची का असेना. तसेच जो संयमी, सच्चरित्र आणि सदाचारी नाही, तो हीन आहे मग तो कोणत्याही देशाचा, जातीचा, वंशाचा, वर्णाचा का असेना. अरबांत प्रेषित मुहम्मद (स.) यांचे कूळ कुरैशला आपल्या श्रेष्ठतेवर फार गर्व होता की, ते दुसऱ्या कुळांना व जातींना हलके समजत असत. मक्का विजयाच्या ऐतिहासिक समयी आपल्या कुरैश जातीला संबोधित करून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ''लोकहो, समस्त मानव दोन भागांतच विभक्त आहेत. एक भाग सदाचारी मनुष्यांचा आणि दुसरा दुराचारी मनुष्यांचा. सदाचारी आणि संयमी ईश्वराजवळ श्रेष्ठ आहेत, दुसरा दुराचारी आणि असंयमी ईश्वरासमक्ष अपमानित आहे. सर्व मनुष्य आदम

(अ.) ची संतान आहे आणि आदम (अ.) यांना ईश्वराने मातीपासून बनविले आहे.'' अशा प्रकारचे विजयी भाषण लंकाविजयासमयी श्रीरामानेसुद्धा दिलेले नाही की कृष्णाने कौरव विजयाच्या वेळी दिले नव्हते. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या जीवनाच्या अंतिम हजसमयी ज्यावेळी अरब देशाच्या कानाकोपऱ्यातून लोक हजला आले होते. लोकांना उद्देशून भाषण केले. ''लोकहो, सावधान! तुम्हा सर्वांचा ईश्वर एकच आहे. एखाद्या अरबाला अरबेतरावर आणि एखाद्या अरबेतराला अरबावर, तसेच गोऱ्याला काळ्यावर आणि काळ्याला गोऱ्यावर श्रेष्ठत्व नाही. परंतु फक्त ईशपरायणता आणि सदाचारावर. ईश्वराजवळ तुमच्यापैकी श्रेष्ठ तो आहे जो सर्वांपेक्षा संयमी आणि सदाचारी आहे.''

अशा प्रकारचा उपदेश आणि आदेश फक्त सांगण्यापुरताच मर्यादित राहिला नाही तर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सहकाऱ्यांमध्ये अरब होते, तसेच अरबेतर होते, गुलामसुद्धा होते. या सर्वांना कुरैशबरोबर फक्त समानताच नव्हती, तर मुस्लिम झाल्यानंतर श्रेष्ठत्वसुद्धा प्राप्त झाले होते. शंभर-दोनशे वर्षांनंतर मुस्लिम बनलेले इतर देशांचे विद्वान नंतर अरबांचे धार्मिक नेता बनले. आजसुद्धा खानपान, धार्मिक विद्यालय आणि मस्जिदीमध्ये इस्लामी समता व विश्वबंधुता पाहावयास मिळते. शूद्र जातीतून इस्लाम स्वीकारल्यानंतर त्या सर्वांना समानतेची आणि बंधुत्वाची वागणूक मिळते. इस्लामच्या समतेचे आणि विश्वबंधुत्वाचे मनोरम दृष्य दरवर्षी मक्का येथे हजप्रसंगी जग पाहात असते.)

## इस्लामचा प्रसार तलवारीने झाला काय?

जगातील सर्व धर्मांपैकी इस्लामची ही विशेषता आहे की, याच्याविरुद्ध जेवढा अपप्रचार झाला तेवढा जगातील अन्य धर्मांविरुद्ध झालेला नाही. सर्वप्रथम आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या वंशाने म्हणजेच कुरैश लोकांनी इस्लामचा विरोध आणि अत्याचार केला. इस्लामची हीसुद्धा विशेषता आहे की, त्याच्याविरुद्ध जेवढा अपप्रचार झाला, तेवढा तो धर्म फैलावत गेला. इस्लाम हा ईशसत्यधर्म असण्याचा हा स्पष्ट पुरावा आहे. इस्लामविरुद्ध जितक्या प्रकाराने अपप्रचार केला गेला आणि सध्यासुद्धा होत आहे त्यामध्ये सर्वांत उग्र स्वरुपाचा अपप्रचार म्हणजे इस्लाम तलवारीच्या जोरावर जगात फैलावला आहे. जगात अनेक धर्म असताना इस्लाम अल्पावधित आश्चर्यकारकपणे कसा फैलावला? या प्रश्नाचे संक्षिप्त उत्तर आहे की, ज्या काळात इस्लामचा उदय झाला, त्या काळातील धर्म भ्रष्ट झालेले होते. म्हणून मानवी कल्याणासाठी ईश्वराने इस्लामला जगात सफल केले. हे ऐतिहासिक सत्य आहे. (ज्याकाळी मक्कावासी आपल्या पूर्ण शक्तीने इस्लाम आणि मुस्लिमांना समाप्त करण्याचा प्रयास करत होते तेव्हा ईशवाणी अवतरित झाली,

“हे लोक आपल्या तोंडाच्या फुंकरीने अल्लाहच्या प्रकाशाला विझवू इच्छितात आणि अल्लाहचा निर्णय हा आहे की तो आपल्या प्रकाशाचा पूर्णपणे फैलाव करणारच. मग अश्रद्धावंतांना हे कितीही अप्रिय का असेना! तोच तर आहे ज्याने आपल्या प्रेषित मुहम्मद (स.) यांना मार्गदर्शन आणि सत्यधर्मासह पाठविले आहे, जेणेकरून त्याला संपूर्ण धर्मांवर प्रभुत्व द्यावे मग अनेकेश्वरवाद्यांना ते कितीही अप्रिय का वाटू नये.” (६१:८-९)

अरबांमध्ये अनेकेश्वरवाद्यांशिवाय ख्रिश्चन आणि यहुदीसुद्धा होते. हे दोन्ही संप्रदाय इस्लामविषयी व्देषभावना ठेवत असत. ख्रिश्चन देशांनीच हा अपप्रचार केला की, इस्लाम तलवारीच्या जोरावर फैलावला आहे. पुढे त्यांच्यातच असे विद्वान होऊन गेले, ज्यांनी या आरोपाचे खंडन केले. आमच्या देशातसुद्धा आरोपकर्ते आणि आरोप खंडनकर्ते विद्वान होऊन गेलेत.) प्रेषित मुहम्मद (स.) यांची प्रेषितपदावर नियुक्ती होण्यापूर्वी अरब धर्मभ्रष्ट आणि दुराचारी होते. अशा पतित लोकांना धर्मात्मा आणि सदाचारी बनविण्यासाठी सर्वथा साधनहीन आणि नि:सहाय असूनसुद्धा ईशप्रेरणेने प्रेषित मुहम्मद (स.) हे एकटे उभे राहिले. ज्या लोकांची मने शुद्ध होती ते प्रेषितांच्या उपदेशामुळे इस्लाम स्वीकार करू लागले, परंतु त्यांच्या वंशाच्या सरदारांनी इस्लाम स्वीकारण्याचे साहस दाखविले नाही. ते त्यांच्या पूर्वजांच्या धर्माला चिकटून राहिले आणि त्यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांची आधीनता स्वीकारली नाही. आपल्या धर्मप्रचार कार्याविरुद्ध ते सरदार लोक विरोधक म्हणून उभे राहिले आणि इस्लामी अनुयायांवर अत्याचार करू लागले. अत्याचारपीडित मुस्लिमांच्या एका समूहाने धर्मासाठी देशत्याग (हिजरत) करून हब्शा (आफ्रिका) मध्ये आश्रय घेतला. मक्कामध्ये अत्याचारचक्र वाढतच राहिले. अंततः प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांच्या अनुयायांचे तिथे आपल्या जन्मभूमीत राहाणे अशक्य होऊन बसले. परंतु मदीना शहरात मात्र इस्लाम घराघरांत पोहचला होता. यावरून अनुमान लावू शकता की, इस्लाम जगात कशाप्रकारे फैलावला? मदीना शहरातील एक जनसमूह हजसाठी मक्का येथे आला. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्यांना इस्लामचा उपदेश दिला. त्यांनी इस्लाम स्वीकारला. दुसऱ्या वर्षी आणखी काही मदीनावासी लोक हजसाठी आले. प्रेषितांच्या उपदेशाने तेसुद्धा इस्लाम स्वीकारते झाले. तिसऱ्या वर्षी मात्र एक मोठा जनसमूह हजसाठी मक्का येथे आला. त्यांनी प्रेषितांपुढे प्रस्ताव ठेवला की, “तुम्ही स्वत: आणि सर्व मुस्लिम मक्का सोडून मदीना शहरी यावे आम्ही तन, मन व धन आपणासाठी त्याग करण्यास तयार आहोत. प्रेषितांनी तो प्रस्ताव स्वीकारला आणि मुस्लिमांना मदीनेला जाण्याचा आदेश दिला आणि ते मदीनेला गेले. हब्शानंतरची ही दुसरी ऐतिहासिक महत्त्वाची 'हिजरत' होती. प्रेषित मुहम्मद (स.) यांना तर रात्रीच्या वेळी अशा स्थितीत 'हिजरत' करावी लागली की, शत्रूंनी त्यांच्या हत्येसाठी त्यांच्या घराला घेरले होते, परंतु

ईशकृपेने ते घराबाहेर सुरक्षित निघून गेले. (मक्कापासून मदीनेला मुस्लिमांची कोणतीच तलवार गेली नव्हती. हा तो काळ होता जेव्हा मक्का शहरातील मुस्लिम पीडित आणि अत्याचारग्रस्त होते. जे मुस्लिम मक्काहून मदीनेला 'हिजरत' करून गेले त्यांच्या हातातसुद्धा तलवार नव्हती. ते सर्व तेथे शरणार्थी बनून गेले होते सैनिक बनून नव्हे. तरीसुद्धा इस्लाम मदीना शहरातील घराघरांत पोहचला.)

हा इस्लामचा तेरा वर्षांचा इतिहास आहे. या काळातील वाटचाल पाहून हेच सिद्ध होते की, इस्लामची सत्यता आणि नैतिकतेची शक्ती तसेच प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तित्वाच्या प्रभावामुळे इस्लाम फैलावत गेला. युद्ध तर शत्रूने त्यांच्यावर लादले होते. ज्याप्रकारे स्वरक्षणार्थ देशत्याग करावा लागला होता, त्याचप्रमाणे स्वरक्षणार्थ युद्ध करण्यास बाध्य झाले. प्रेषित आणि त्यांच्या अनुयायींनी देशत्याग करूनसुद्धा शत्रूपक्षाच्या शत्रुत्वाचा अग्नी शांत झाला नव्हता. त्यांनी मदीना शहरावर आक्रमण करण्यास सुरू केले. आता फक्त धर्मरक्षणाचाच प्रश्न नव्हता, तर प्राणरक्षणाचासुद्धा प्रश्न उद्‌भवला होता. याच परिस्थितीत ईश्वरापासून मुस्लिमांना स्वत:चे रक्षण करण्यासाठी 'जिहाद' करण्यास परवानगी मिळाली. इस्लामचे विरोधक, आरोप करतात की, प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आंदोलन मक्काकाळात पूर्ण शांतीरूप होते, परंतु मदीना येथे त्यांना शक्ती प्राप्त झाली आणि त्यांनी आपली नीती बदलली. हा किती अन्यायपूर्ण आक्षेप आहे? त्या परिस्थितीतसुद्धा प्रेषितांनी आपल्या अनुयायींना आज्ञा दिली पाहिजे होती काय की, 'आपल्या धर्माचे रक्षण करू नका आणि स्वत:च्या माना कापून घ्या?' स्वरक्षणार्थ युद्ध कोणत्या धर्मात आणि राजनीतिमध्ये वर्जित आहे? श्रीरामाने तर पत्नीसाठी आणि श्रीकृष्णाने भूमीसाठी युद्ध केले. श्रीरामाच्या युद्धाने देशाचे आणि राष्ट्राचे कोणते कल्याण झाले होते? श्रीकृष्णाच्या युद्धाची फलश्रुति त्यांच्या नातेवाईकांचा आणि अर्जुनाचा परिवार नष्ट होण्यात झाली आणि राष्ट्राची शक्ती क्षीण झाली होती. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी जे युद्ध केले त्यात त्यांचे अनुयायीं कमी संख्येत शहीद झाले होते. मक्का विजयप्रसंगी प्रेषितांनी आपल्या २१ वर्षांच्या कारकीर्दीमध्ये शत्रूंना, ज्यात मोठमोठे अत्याचारी आणि अपराधी लोक होते, सर्वांना क्षमादान दिले. इस्लामी जीवनव्यवस्था प्रस्थापित झाली आणि विखुरलेला समाज एकत्र येऊन एकसंघ होऊन सदृढ बनला.

इस्लामला तलवारीच्या बळावर फैलावलेला धर्म म्हणणारे या ऐतिहासिक सत्याशी अवगत असतील की, मुस्लिमेतर विजेता तातारी यांनी पराजित अरबांचा धर्म म्हणजेच इस्लाम धर्म स्वीकारला होता. विजयी तातारी लोकांनी स्वत:हून इस्लाम धर्म स्वीकारला अशी विचित्र घटना कशी घडली? तलवारीचे बळ तर विजेता पक्ष तातारींकडे होते, मग ती विजयी तलवार (तातारी लोक) इस्लामद्वारा पराजित कसे झाले? इस्लामच्या

विलक्षण प्रसारावर आक्षेप घेणाऱ्या लोकांजवळ याचे काय उत्तर आहे ?

मंगोलियन लोकांच्या अतोनात अत्याचारांचे निराकरण इस्लामऐवजी कोणत्या धर्माजवळ होते? सर्व जग मंगोलियन लोकांच्या अतोनात अत्याचाराने आणि दुराचाराने त्रस्त झाले होते. त्यांना सभ्यता आणि संस्कृतीचा धडा शिकवून त्यांना माणूस बनविण्याचे श्रेय फक्त इस्लामला आहे. चीन, दक्षिण-पूर्व आशियाई देश आणि आफ्रिका देशात इस्लामचा प्रसार तलवारद्वारा झाला काय? इतिहास याविरुद्ध साक्ष देत आहे. शक्य आहे की, मध्ययुगीन युरोप, भारत तथा अन्य देशांत जी युद्धे झाली त्यात मुस्लिम विजयी झाले. तिथे मुस्लिम समाज प्रस्थापित झाला. तिथे मुस्लिमेतर लोकांवर अत्याचार झाले असतील. इस्लाम राजधर्म असल्याने बळप्रयोग काही अतिउत्साही आणि अविवेकी मुस्लिमांकडून झाला असेल. परंतु अशा प्रकारच्या युद्धजन्य दुर्घटना आणि अविवेकपूर्ण अत्युत्साहाला इस्लामच्या खात्यात जमा करणे अतिशय अन्यायकारक आहे. ही युद्धे तर त्या प्रकारची होती जसे मुस्लिम-मुस्लिमांमध्ये, हिंदू-हिंदूंमध्ये, ख्रिश्चन-ख्रिश्चनांमध्ये मराठा-मराठांमधील युद्धे होती. आम्ही अशा युद्धांच्या राजनैतिक कारणांपासून दूर राहून हिंदू आणि मुस्लिमांतील युद्धांचे कारण फक्त इस्लामला ठरविले तर ते वास्तविकतेच्या विरुद्ध नाही का?

भारतात अशा प्रकारची युद्धे अपवादात्मक झाली, ज्यात हिंदू आणि मुस्लिम समोरासमोर होते. प्रारंभी असे झालेसुद्धा असेल. परंतु मुस्लिमांचे भारतात स्थायी रूपात वास्तव्य झाल्यानंतर असे झालेले दिसत नाही. सन १५६५ मध्ये तालीकोटचे युद्ध बहामनी मुस्लिम आणि हिंदू राज्य विजयनगरमध्ये झाले होते. त्यात मुस्लिमांकडून मोठ्या प्रमाणात विनाश झाला, परंतु त्यापूर्वी विजयनगरच्या हिंदू राजाने अहमदनगरच्या मुस्लिम राज्याला बरबाद केले होते आणि मुस्लिमांवर घोर अत्याचार केले होते. त्याचीच प्रतिक्रिया तालीकोटमध्ये झाली होती. इस्लामवर बळजबरीने प्रसार करण्याचा आरोप लावणाऱ्यांनी या ऐतिहासिक सत्याला डोळ्यांसमोर ठेवावे की, मेक्सिको ख्रिश्चनांनी लाखो ख्रिश्चनेतरांना ठार केले होते. बौद्ध धर्माचा लोप आपल्या जन्मभूमीत आपोआप झाला नव्हता, तर ब्राह्मणांनी बौद्धांवर घोर अत्याचार केले. ख्रिश्चनांनी आपल्याच संप्रदायाच्या लोकांना जीवित जाळले, विशेषकरून पोर्तुगालांचा धार्मिक उन्माद आणि ख्रिश्चन मिशनरींद्वारा अनेक प्रलोभने देऊन धर्मपरिवर्तन करणे, ही सर्व कृत्यें साम्राज्यवादी प्रेरणेने प्रेरित होती. गोऱ्या ख्रिश्चनांचा काळ्या ख्रिश्चनांवर घोर अत्याचार, हिंदूंचा आपल्या स्वधर्मिय हरिजनांवर पारंपरिक अत्याचार. हे सर्व तथाकथित 'मुस्लिम धर्मोन्मादा'पेक्षा कितीतरी पटीने जास्त आहे. खरे तर इस्लामचा विलक्षण प्रसार त्याच्या सहजसरळ प्रवृत्तीने, शुद्ध समतावादाने आणि त्याच्या नैतिक शक्तीनेच झालेला आहे.

# 'काफिर' शब्दाचा अर्थ

कुरआनचा आदेश आहे की, 'युद्धसमयी अधर्मियांना (काफिर) आपले मित्र बनवू नका. त्यांच्याशी युद्ध करा आणि त्यांना ठार करा जिथे जिथे ते सापडतील.' इस्लामविरोधींनी कुरआनच्या या संकेतवचनाला घेऊन इस्लामविरुद्ध भयंकर अपप्रचार केला आहे. काफिर हा शब्द हिंदूंचा पर्यायी शब्द मुळीच नाही. 'काफिर'चा मूळ अर्थ 'अधर्मी' तथा 'कृतघ्न' असा आहे. दुसरा अर्थ आहे 'नकार देणारा.' म्हणून जी व्यक्ती प्रेषित मुहम्मद (स.) यांचे प्रेषित्त्व आणि ईशग्रंथ कुरआनवर विश्वास ठेवत नाही आणि त्यांना मान्य करीत नाही, ती नकार देणारी आणि कृतघ्न आहे, म्हणजेच काफिर आहे. याच अर्थाने प्रेषित मुहम्मद (स.) आणि कुरआनला अमान्य करणाऱ्यास काफिर म्हटले गेले आहे. या अर्थानुसार यहुदी, ख्रिस्ती, पारसी यांच्याविषयीसुद्धा काफिर हा शब्द प्रयुक्त होतो. मुस्लिमेतर तर सोडा परंतु मुस्लिमांपैकी ज्यांनी नमाजचा इन्कार केला तर तो काफिर होतो, द्रोही बनतो.

वैदिक धर्मात काफिरचा पर्यायवाचक शब्द नास्तिक आहे. बुद्ध वेदांना मान्य करत नव्हते म्हणून त्यांना नास्तिक अर्थात काफिर म्हटले जाते. बौद्ध धर्म हा हिंदू धर्माच्या अगदी विरुद्ध आहे. म्हणून काफिर हा शब्द हिंदूंसाठी अपमानजनक नाही की 'नास्तिक' हा शब्द मुस्लिमांसाठी अपमानजनक नाही. व्यवहारात मुस्लिम हिंदूंना हिंदू म्हणतात आणि हिंदू मुस्लिमांना मुस्लिम म्हणतात, हेच सज्जनतेचे लक्षण आहे. इस्लाम धर्मात मुस्लिमेतरांसाठी केवळ एकच शब्द काफिर प्रयुक्त आहे तर हिंदू धर्मात अहिंदूसाठी माया, अनार्य, दस्यू, असभ्य, म्लेंच्छ इ. अनेक शब्द प्रयुक्त आहेत. हिंदू तर आपल्या सहधर्मियांतील एका वर्गाला म्हणजे शूद्रांना चांडाळ आणि अस्पृश्य म्हणतात. इस्लाममध्ये काफिर हा शब्द गुणवाचक शब्द आहे, अपमानजनक शब्द मुळीच नाही.

# सगोत्र विवाह

इस्लाममधील सगोत्र विवाहाला आक्षेप घेतला जातो. परंतु सगोत्र विवाह मनोवैज्ञानिक, पारिवारिक, सामाजिक, आर्थिक दृष्टिकोनातून योग्य आहे. सगोत्र विवाह अन्य धर्मांतसुद्धा आहेत. सगोत्र विवाहाच्या विरोधी हिंदूंचे पूर्ण अवतार श्रीकृष्णाला सगोत्र विवाह मान्य होते. हिंदूंमध्ये विरोधाभास प्रचलित आहे. हिंदूंची परंपरा आहे की, ते आपल्या पूर्वजांचा इतिहास मान्य करताना निषेधात्मक नैतिकतेच्या नावावर विभक्त होतात. इस्लाममध्ये ज्या सगोत्र विवाहाला मान्यता आहे आणि ज्या सगोत्र विवाहाला मान्यता नाही त्यांचा आधार मनोवैज्ञानिक आहे. संक्षिप्तपणे या मनोवैज्ञानिक वास्तविकतेला समजण्यासाठी आपण उदाहरण घेऊ या की, आपली सख्खी बहीण आणि चुलत अथवा मानलेली बहीण यात समसमान भावना राहत नाही. हिंदूंमध्ये सगोत्रतेचे व्यापक क्षेत्र निर्माण केल्यामुळे एका पिढीत जरी शक्य झाले नाही तरी दुसऱ्या पिढीत मात्र दोन सख्खा भावांचे कुटुंब अनोळखी बनते. एक धनी किंवा श्रीमंत भाऊ आपल्या गरीब भाऊ अथवा बहिणीची सर्वोत्तम साहाय्यता याच रूपात करू शकतो की, आपल्या मुलाचे लग्न गरीब भाऊ किंवा गरीब बहिणीच्या मुलीशी करेल. आकस्मित साहाय्यता किंवा मदत प्रभावी ठरत नाही. तर त्यामुळे हीन भावना उत्पन्न होतात. वास्तविकपणे समाजवादाची आधारशिला सगोत्र विवाह आहे. सगोत्र विवाहाचा निषेध हुंड्याची वृद्धी करतो आणि कौटुंबिक स्वास्थ्य बिघडवून टाकतो. मुलीचा जन्म झाल्या झाल्या आईवडिलांना चिंता वाटू लागते की, तिचा विवाह कुठे करावा! मुलीच्या वडिलांचे या कामी पायपीटीने चपला झिजतात. परंतु दुसरीकडे गोत्रात योग्य मूल उपलब्ध असते. अपरिचित लोकांतील विवाहाचा कधीकधी भयंकर परिणाम होतो. पूर्णावतार श्रीकृष्णाला सगोत्र विवाह मान्य होते. कुंती श्रीकृष्णाची आत्या होती अर्जुन कुंतीचा पुत्र होता. अशा प्रकारे अर्जुन सुभद्रेचा मामेभाऊ होता. परंतु त्याचा विवाह श्रीकृष्णाची भाची अर्थात बलरामाच्या मुलीशी झाला होता. श्रीकृष्णाचे प्रेम राधेशी होते जी त्याची मामी होती. पृथ्वीराज आणि जयचंद ऐतिहासिक पुरुष होते. दोघे सख्खे मावस भाऊ होते. पृथ्वीराजचे प्रेम जयचंद्रच्या मुलीवर होते. ते मनोविज्ञानाच्या विरुद्ध नव्हते. जर दोघांचे लग्न झाले असते तर दोघांचा आणि हिंदू राज्याचा सर्वनाश झालाच नसता. या ऐतिहासिक घटनांनुसार सगोत्र विवाहाविरुद्ध जाऊन हिंदूंनी गर्व करणे उचित नाही. (आणि इस्लामी समाजातील सगोत्र विवाहवर आक्षेप घेणे सर्वथा अनुचित आणि अतार्किक आहे.)

# इस्लाम आणि गुलामी

जे लोक असे समजून आहेत की, इस्लाम गुलामीची व्यवस्था कायम ठेवण्याचा दोषी आहे आणि इस्लाम गुलामी प्रथेचा समर्थक आहे, तर ही त्यांची समजूत सर्वथा भयग्रस्त आहे. इस्लामच एकमात्र असा धर्म आहे जो मनुष्याला मन, वचन आणि कर्माने समतावादी बनविण्यास सक्षम आहे.

(गुलामीची प्रथा आणि चार पत्नींची गोष्ट एकसारखीच आहे. अरबांमध्ये अज्ञानकाळापासून गुलामीची प्रथा प्रचलित होती. दोन-चार गुलाम सामान्य कुटुंबात राहत असत. श्रीमंतांकडे आणखीन जास्त गुलाम ठेवले जात असत. गुलाम अरबांच्या कौटुंबिक व्यवस्थेचा अंग बनले होते. ते आपल्या मालकांच्या शेतात, बगिचात काम व राखण करत असत. उंट, शेळ्या चारत असत आणि स्त्री गुलाम घरची कामे करीत असत. गुलामाचे राहणे, खाणे-पिणे सर्व मालकांवरच अवलंबून असे. इस्लामने जर गुलामाच्या स्वातंत्र्यासाठी नियम बनविले असते, तर त्याचा काय परिणाम झाला असता? एकीकडे गुलाम बेघर आणि उपजीविकेला मुकले असते, तर दुसरीकडे अरबांची जीवनव्यवस्था कोलमडली असती.

अशा स्थितीत इस्लामने, गुलामी प्रथेला एकदम समाप्त करणे व्यावहारिक रूपात असंभव आणि सैद्धान्तिक स्वरुपात अयोग्य समजले. परंतु इस्लामने गुलामांना स्वतंत्र करण्यासाठी लोकांना प्रेरित केले आणि ह्यास पुण्यकर्म ठरवून दिले. जर कोणी गुलाम ठेवीत असेल, तर असे नियम घालून दिले की, गुलाम कुटुंबाचा एक घटक बनला. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आदेश दिला,

"तुमचे गुलाम तुमचे भाऊ आहेत. म्हणून तुमच्या ताब्यात जर तुमचा भाऊ (गुलाम म्हटले गेले नाही) असेल तर त्याने त्यास तेच खाण्या-पिण्यास दिले पाहिजे जे तो खातो-पितो आणि मालक जसे कपडे वापरतो त्याच प्रकारे त्यास दिले पाहिजे. त्याच्या शक्तीपलीकडचे काम त्याला देऊ नये, तसे असल्यास स्वत: त्याची मदत करावी."

अशा प्रकारे गुलाम स्वतंत्र करण्यासाठी अनेक मार्ग खुले केले गेलेत ते खालीलप्रमाणे,

१) गुलामांना स्वतंत्र करणे पुण्यकर्म ठरविले गेले. म्हणून लोक आपल्या गुलामांनाही तसेच पुण्यार्थ दुसऱ्यांचे गुलाम खरेदी करून स्वतंत्र करत असत.

२) कोणी रमजान महिन्याचा रोजा ठेवून त्यास अकारण मोडला तर प्रायश्चित्ताबद्दल एक 'गुलाम स्वतंत्र करणे' हे प्रायश्चित्त सामील केले गेले होते.

३) कोणी शपथ घेऊन नंतर ती शपथ मोडत असेल, तर प्रायश्चित्तासाठी एक गुलाम स्वतंत्र करण्याच्या विधीचा समावेश केला गेला.

४) अरब लोक पत्नीला रागाच्या भरात कधीकधी म्हणत की, ''तू माझ्या मातेसमान आहे, म्हणजे यापुढे मी तुझ्याशी शारीरिक संबंध ठेवणार नाही.'' यानंतर तो आपल्या त्या पत्नीशी संबंध स्थापित करू इच्छित असेल, तर त्याचे प्रायश्चित्तसुद्धा एक गुलाम व्यक्ती स्वतंत्र करणे होते.

५) दासीबरोबर व्यभिचार करण्याची शक्यता असते. त्याचे भयंकर नैतिक आणि सामाजिक दुष्परिणाम होतात. अशा दुष्परिणामांपासून समाजाला वाचविण्यासाठी इस्लामने दासींना ठराविक सीमेपर्यंत पत्नीचा दर्जा बहाल केला आणि त्यांच्या संततीला स्वतंत्र घोषित केले.

भारतात दास प्रथेला धार्मिक मान्यता होती. दास (गुलाम) जन्माने गुलामच होता आणि कोणत्याही परिस्थितीत तो दास्यत्वातून (गुलामीतून) कधीही मुक्त होत नसे.

''शूद्र खरेदी केलेला असो अथवा नसो त्यापासून नोकराचेच काम घ्यावे, कारण ब्रह्माने ब्राह्मणाच्या सेवेसाठीच त्याला निर्माण केले आहे.'' (मनुस्मृती)

''स्वामीने (मालकाने) त्याला सोडून जरी दिले तरी शूद्र गुलामगिरीतून कधीही मुक्त होत नाही, कारण ती त्याची स्वाभाविक वृत्ती आहे. त्यापासून त्याला कुणीही स्वतंत्र करू शकत नाही.'' (मनुस्मृती)

''युद्धात जिंकून आणलेला, भोजनासाठी आलेला, दासींनी जन्माला घातलेला, खरेदी केलेला, कुणी दिलेला, वडिलोपार्जित घरकाम करणारा, जो दंड, कर्ज इ. फेडण्यासाठी गुलाम बनला हे सात प्रकारचे दास आहेत.'' (मनुस्मृती)

''शूद्राच्या संपत्तीचे धनी ब्राह्मण आहेत.'' (मनुस्मृती)

ही होती भारतात दास प्रथेची अवस्था अरबात गुलामांची जात नव्हती की वर्ग नव्हता. गुलाम स्वतंत्र होत असत. भारतात दास प्रथा धार्मिक होती. अरबमध्ये इस्लाम आला तर दासमुक्ती धर्माचे एक पुण्य व पवित्र अंग बनले. भारतात मुस्लिम संत आले तेव्हा त्यांनी लाखो शूद्रांना प्रतिष्ठा बहाल करून दिली. भारतातील करोडो मुस्लिम त्यांचीच संतती आहे. अरब आणि भारतातील दास (गुलाम) यांची संतती पुढे मुस्लिमांची धार्मिक नेता बनली. हिंदूंचा उच्चवर्ग आजसुद्धा शूद्रांच्या अधिकाराविरुद्ध संघर्षरत आहे. हे गुलाम केवळ राजनैतिक योग्यतेच्या बळावर शासक आणि सम्राट बनले नाहीत तर विचारवंत, विद्वान आणि धर्माचार्य बनले. वर्तमानकाळात भारतात हरिजनांबरोबर दुर्व्यवहार आणि प्रतिरोधात्मक संघर्ष आणि नरसंहार वाढतच जात आहे.)

दास प्रथेविषयी इस्लाम आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मानसोपचार पद्धतीचा अवलंब केला. जगात इस्लामच असा धर्म आहे ज्याने हृदयपरिवर्तन आणि बुद्धिविवेकाने कुप्रथेचे उन्मुलन केले. एका दिवसात सत्तर वेळा गुलामाला माफ करण्याचा आदेश दिला आणि घोषित केले की, गुलामाला 'माझा गुलाम' म्हणू नका तर 'माझा मुलगा अथवा मुलगी' म्हणा. गुलामापासून अधिक काम घेऊ नका आणि कठीण कामात त्यांची मदत करा हा आदेश देऊन इस्लाम आदेश देतो की, **''तुम्ही सर्व जण ईश्वराचे गुलाम आहात.''** इस्लाम आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांनी गुलामीच्या वृक्षाला वरून कापण्याऐवजी त्या वृक्षाचे मूळ कापून टाकले. गुलामीच्या त्रासालाच दूर केले नाही तर, त्यांचा दर्जा उंचावला. इस्लामी समतेच्या संदर्भातील जादूच्या प्रभावाला इतिहास साक्षी आहे. भारतात गुलाम वंशाचे शासन एक ज्वलंत प्रमाण आहे. गुलामांच्या शक्तीच्या आधारावर शासक बनले नाही, तर योग्यतेच्या आधारावर सम्राटाच्या पदापर्यंत पोहचले. मुस्लिम सम्राटांनी योग्यताधारक गुलामांना पुत्राप्रमाणे प्रेम व स्नेह दिले. या उलट प्रशासकीय कायदेनिर्मिती झाल्यानंतरसुद्धा गोऱ्या ख्रिश्चनांचा काळ्या ख्रिश्चनांवर आणि सवर्ण हिंदूंचा करोडो हरिजनांवर अत्याचार आणि दुर्वव्यवहार वाढतच आहे. हे तथाकथित गुलामीच्या प्रथेपेक्षा कितीतरी पटीने जास्त भयानक आहे, त्याचा खोटा आरोप इस्लामवर लावला जातो.

## शव जाळणे उचित की दफन करणे?

मुस्लिमांच्या शवांना दफन करण्यास अवैज्ञानिक म्हटले जाते, परंतु शवांना जाळण्यापेक्षा दफन करणेच अधिक वैज्ञानिक आणि बुद्धिसंगत आहे. ख्रिश्चन, मुस्लिम आणि यहुदी दफनपद्धतीचा स्वीकार करतात, तर हिंदू, बौद्ध आणि शीख आपल्या शवांना जाळतात. जगातील बहुसंख्याक लोकांनी दफनविधीला स्वीकारले आहे. विज्ञाननिष्ठ यूरोप आणि अमेरिकेमध्ये दफनपद्धती प्रचलित आहे. या पद्धतीने वायू आणि जल प्रदूषित होतात म्हणणे अयोग्य आहे. अर्ध जळालेल्या शवाला पाण्यात फेकल्याने जल प्रदूषित होते. या महागाईच्या दिवसांत हिंदू पद्धतीचा शवदाह असंभव आहे. शुद्ध तूप, चंदनाचे लाकूड, तसेच अन्य सुगंधी द्रव्ये दाहक्रियेत वापर करणे अशक्य आहे. डॉक्टरांचा अहवाल आहे की, गंगा आणि यमुनेचे पाणी दूषित झाले आहे. जर दफन अवैज्ञानिक आहे, तर हिंदू संन्याशासाठी दफनविधी अवैज्ञानिक का नाही? समाधी आणि दफन एकच आहे. हिंदूंची दाहपद्धती अत्यंत खर्चिक आहे. दफनपद्धत सरळ, कमी खर्चाची, सर्वग्राह्य व सार्वराष्ट्रीय आहे. ही सहज, सरळ व सोपी पद्धत आहे. हिमवासी कसे हिंदू पद्धतीने शवाचे दहन करू शकतील? इतिहासानुसार शवांना दफन करणे मूळ पद्धत आहे.

# पुनर्जन्म सिद्धान्त

पुनर्जन्म सिद्धान्त हिंदू धर्मात सर्वमान्य सिद्धान्त आहे. हिंदूंच्या ईश्वरकृत वेदांत मूलत: पुनर्जन्माचा उल्लेख नाही. ही संकल्पना नंतरची उत्पत्ती आहे. हिंदूंच्या घराघरांत प्रत्येक वादावर विवाद आहे. पुनर्जन्माविषयीसुद्धा विरोधाभास आहे. हिंदूंच्या धार्मिक ग्रंथांत आणि सामान्य धार्मिक विश्वासात व गरुड पुराणात स्वर्ग-नरकाला मान्यता आहे. मेलेल्या माणसासाठी स्वर्गवासी शब्दाचा प्रयोग केला जातो. गीतेमध्ये मृत्यूला जुन्या वस्त्राचा त्याग करून नव्या वस्त्राच्या रूपात अन्य जीवन धारण करून अर्जुनाला या शरीराच्या नश्वरतेचे ज्ञान करून दिले आहे. याच गीतेत अर्जुनाला सांगितले गेले की, 'मेला तर स्वर्गात जाशील आणि विजयी झाला तर राज्य करशील.' यावरून हेच सिद्ध होते की, पुनर्जन्म आणि आवागमन सिद्धान्ताव्यतिरिक्त हिंदूंमध्ये धार्मिक आणि नैतिक रूपात स्वर्ग-नरकावरील विश्वास सामान्यता: जोडलेला आहे. गीता सिद्ध करत आहे की, नैतिकतेचा प्रेरणा स्वर्ग-नरक विश्वासावर अवलंबून आहे. गीतेचा मुख्य हेतू अर्जुनाला निमित्त मात्र बनवून मनुष्याला नैतिक कार्यासाठी प्रेरित करणे हा होता. यासाठी श्रीकृष्णाने स्वर्गाच्या उपलब्धीला एकमात्र उपाय सांगितला. यावरून हेच सिद्ध होते की, पुनर्जन्म हिंदू तत्त्वज्ञानाचा एक दार्शनिक सिद्धान्त असला, तरी हिंदू धर्मात स्वर्ग-नरकाला धार्मिक मान्यता आहे. पुनर्जन्माचा सिद्धान्त तर्कशास्त्राच्या विरोधी आहे. हे कलियुग आहे असे म्हटले जाते आणि पाप वाढत जात आहे. सतयुगात पाप कमी होते. पुण्याईमुळेच मनुष्ययोनी प्राप्त होते आणि पापामुळे पशुयोनी मिळते, असे असेल तर आज कलियुगात पाप सीमेपलीकडे होत आहे, मग दररोज लोकसंख्या सतत कशी वाढत चालली आहे? जर पापी व्यक्ती या जन्मातच पापाबद्दल आणि त्याच्या परिणामांबद्दलचे भान ठेवत नाही, तर पुनर्जन्माबाबतची जाण त्याला कशी करून द्यावी? निश्चितच नाही! अशा परिस्थितीत पुनर्जन्माचा सिद्धान्त व्यर्थ आणि निरुपयोगी आहे. हे नीतिशास्त्राविरुद्धसुद्धा आहे. समजा, एखाद्याचा किशोरवयातील पुत्र मरण पावला आणि आम्ही सांत्वना देताना दु:खी पित्याला असे म्हणावे काय की, 'मागील जन्मात दुसऱ्याच्या पुत्राची हत्या केली होती.' दु:खात तर संयम राखण्यासाठी सांत्वना केली जाते.

# जिझियाचा अभिप्राय

जिझियाविषयी मुस्लिमेतरांमध्ये अनेकानेक गैरसमज आहेत. जिझिया हा मुस्लिमेतरांसाठी नाममात्र असा रक्षाकर होता. कारण इस्लामी राज्यात मुस्लिमेतर जनता आत्मरक्षा करण्यापासूनच्या जबाबदारीतून मुक्त होती. मुस्लिमेतरांची रक्षा करणे हे मुस्लिमांचे कर्तव्य होते. जिझिया या तथ्याचे प्रमाण होते की, इस्लाममध्ये बळजबरीचे धर्मपरिवर्तन कोणत्याच स्थितीत मान्य नाही, कारण जिझिया कर दिल्यानंतर मुस्लिमेतर जनतेला पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य प्राप्त होते. इतिहास साक्ष आहे की, ब्राह्मण जे हिंदुत्वाचे सर्वेसर्वा आहेत, जिझियापासून मुक्त होते. अकबर, जहाँगीर आणि शाहजहानच्या काळात जिझिया लागू नव्हता.

(आता जिझिया जगात मुस्लिम राष्ट्रांत कुठेच लागू नाही. परंतु जिझियाविषयी आजसुद्धा अपप्रचार जोरात आहे आणि राजेंद्रजींना स्पष्टीकरण द्यावे लागत आहे. अनेक मुस्लिम देशांत ख्रिश्चन आणि हिंदूसुद्धा आहेत, परंतु कोणत्याच देशात त्यांच्यापासून जिझिया घेतला जात नाही. बांगलादेशात हिंदू आहेत, तसेच पाकिस्तानातसुद्धा हिंदू आहेत. या देशांत जिझिया कर नाही. आम्ही हिंदू बंधुना माहिती करून देतो की, बांगलादेश आणि पाकिस्तानात जिझिया हिंदूंकडून घेतला जात नाही, कारण इस्लामी विधानानुसार मुस्लिमेतर जनतेकडून या देशांना जिझिया घेण्याचा अधिकार नाही. पाकिस्तानचे संविधान शुद्ध इस्लामी संविधान झाले, तर तिथे हिंदूचे अधिकार आणखी सुरक्षित होतील. राज्यांना हिंदूंच्या धर्मात, परंपरा, भाषा, संस्कृतीमध्ये हस्तक्षेप करण्याचा अधिकार राहत नाही. ते पाकिस्तानचे असेच नागरिक राहतील जसे मुस्लिम. इस्लामी राज्यात प्रजा तीन प्रकारची असते. १) अशी प्रजा जी लढाईत पराजित होऊन इस्लाम न स्वीकारता आपल्या पूर्वीच्या धर्मावर कायम राहू इच्छिते तिला जिझिया द्यावा लागतो. २) युद्धाच्या अगोदर सशर्त करारनामा झालेला असेल, तर जिझिया घेतला जाऊ शकत नाही. ३) इस्लामी राज्यातील ते मुस्लिमेतर नागरिक जे युद्धात पराजित होऊन नागरिक बनले नाहीत की करारद्वारे अशा मुस्लिमेतरांपासून जिझिया घेतला जात नव्हता.)

# युरोप आणि भारतात इस्लामप्रवेशाचा परिणाम

युरोपात आणि भारतात इस्लामप्रवेशाचे प्रमुख कारण मानवी गरज आणि ईशप्रेरणा आहे. युरोपात इस्लामप्रवेश आणि ख्रिश्चन व मुस्लिमांमधील युद्धांना ख्रिश्चन 'क्रुसेड' (धर्मयुद्ध) म्हणतात आणि मुस्लिम 'जिहाद' म्हणतात. या युद्धांचे स्वरूप काहीही असो. मुस्लिमेतर इतिहासकार या सत्याचा स्वीकार करतात की, युरोपाला रानटीपणापासून सभ्य बनविण्यात इस्लामचा फार मोठा वाटा आहे. मुस्लिमांनी युनानी साहित्य, तत्त्वज्ञान, विज्ञान आणि गणिताची सुरक्षा आणि प्रगतीमध्ये मोठे योगदान दिले. यूरोपला इस्लामद्वारा प्रकाशित केले. उच्च शिल्पकलेचा प्रवेश इस्लामप्रवेशानेच झाला होता. मुस्लिमांनी यूरोपमध्ये मोठ्या उदारतेचे प्रदर्शन केले. (या ऐतिहासिक सत्याचा यूरोपियन ख्रिस्ती विद्वान, इतिहासकार व समाज स्वीकार करतात.)

मुस्लिमांच्या संपर्काने यूरोपचा मोठा फायदा झाला, परंतु नंतरच्या काळात यूरोपबरोबरचा संपर्क तुटल्यानंतर मात्र यूरोपमध्ये भौतिक प्रगतीने शिखर गाठले, परंतु नैतिक शिखरावरून युरोप खाली घसरला. नैतिक मूल्यांच्या घसरणीचा हा परिणाम आहे. संपूर्ण यूरोप, अमेरिका, व्यभिचार, मदिरा, जुगार, हत्या आणि घोटाळ्यात पुरते रुतले आहेत. यूरोपमध्ये मागासलेपण त्या जागी सभ्यता आणि मानवतेची आवश्यकता होती आणि यासाठी ईशप्रेरणेने तिथे इस्लामचा प्रवेश झाला. इस्लामने तिथे नैतिकता, समता, सद्गुणांचा प्रकाश फैलावला. मार्टिन ल्युथर किंगसारख्या महापुरुषांना इस्लाममुळे प्रेरणा मिळाली. याचप्रमाणे भारतात इस्लामचा प्रवेश मानवतेची आवश्यकता आणि ईशप्रेरणेच्या पूर्ततेसाठी झाला. भारतात तर श्रेष्ठ सभ्यतेचा पूर्ण विकास झाला होता, परंतु सभ्यतेची पराकाष्ठाच सर्वकाही नाही. अनैतिकता, राजनैतिक संघर्ष, अस्पृशांबद्दलची घृणा विकोपाला पोहचली होती. धर्मात भ्रष्टाचार बोकाळला होता. बुद्धमठ दुराचार, व्यभिचार, जादूटोण्याचे केंद्र बनले होते. हीच स्थिती हिंदू धर्माची होती. ते आपल्या प्राचीन धर्माच्या आदर्शापासून विमुख झाले होते. ते सर्वथा कोत्या मनाचे आणि संकुचित डोक्याचे बनून राहिले. गीतेच्या शब्दांत धर्माला ग्लानी आली होती. अशा दयनीय अवस्थेला ईश्वर सहन करू शकत नव्हता.

भारतात इ.स. ७१२ मध्ये इस्लाम प्रवेशकरता झाला. नैसर्गिक आणि राजनैतिक कारणांसाठी इस्लामचा प्रवेश सिंध प्रदेशात झाला. तिथे मुस्लिम शासन स्थापित झाले. मोठ्या उदारतेने मुस्लिमांनी नंतर सिंध प्रांताची सत्ता पुन्हा हिंदूंच्या हातात दिली. अशा प्रकारे मुस्लिमांची जणू काही सिंध प्रांतातील हिंदूंना पूर्वसूचना केली गेली होती. हिंदूंमध्ये सुधारणा झाली नाही, विनाशाकडे ते जणू धावत सुटले होते. ईश्वराने त्यांना तीनशे वर्षांची

सवलत दिली, परंतु त्यांच्यात सुधारणा घडून आली नाही. ईश्वराच्या नावाने अमाप धन मंदिरात जमा होऊ लागले आणि ईश्वराच्या नावाने मंदिरांमध्ये देवदासींचे लैंगिक शोषण, धार्मिक मान्यताप्राप्त बनले. या दुराचारी समाजप्रणालीवर ईशकोपाच्या रूपात महमूद गझनवीचा प्रवेश झाला. तो सतरा वेळा भारतात आला होता आणि गाढ झोपी गेलेल्या हिंदूंना जागे करण्यासाठी प्रयत्न करीत राहिला. परंतु हिंदू जागे झाले नाहीत. ईश्वराने त्यांना दीडशे वर्षांची आणखी सवलत दिली तरी हिंदू जागृत झाले नाहीत. अंततः ईशप्रेरणेने मुहम्मद घोरीने हिंदूंची सत्ता संपुष्टात आणली. (ऐतिहासिक प्रमाणानुसार हेच सिद्ध होते की, ईश्वर त्याच्या धरतीवर अत्याचार, दुराचार, व्यभिचार, शोषण, अन्याय यांना जास्त काळ वास्तव करू देत नाही. सुधारणेसाठी सवलत, वेळ आणि सवड ईश्वर अवश्य देतो, ज्यात काही शतकेसुद्धा व्यतीत होतात. शेवटी मात्र त्या अत्याचारी, अन्यायी, अवज्ञाकारी शासनव्यवस्थेतील लोकांना पराभूत करून सक्षम व सदाचारी लोकांच्या हातात सत्ता देतो. या ईशनियमाला ''थांबा आणि सुधार करा''चा नियम असे म्हटले जाते. म्हणून बाहेरच्या आक्रमणांना या संदर्भातसुद्धा पाहिले गेले पाहिजे. फक्त भौतिक आणि राजनैतिक संदर्भात पाहिले जाऊ नये.)

अनेक शतकांसाठी भारतावर मुस्लिमांचे राज्य होते आणि आज ते भारताला आपला देश मानून येथे राहतात. ते भारतात जन्मतात, जगतात आणि मरतात. जगसुद्धा त्यांना भारतीय मानते. मुस्लिमांचे अस्तित्व भारतासाठी वरदान सिद्ध झाले आहे. उत्तर आणि दक्षिण भारताच्या एकतेचे श्रेय मुस्लिम साम्राज्य आणि केवळ मुस्लिम साम्राज्यालाच जाते. मुस्लिमांचा समतावाद हिंदूंना प्रभावित केल्याशिवाय राहिला नाही. अधिकांश हिंदू सुधारक जसे रामानुजम, रामानंद, नानक, चैतन्य इ. मुस्लिम भारताचीच देणगी आहे. भक्ती आंदोलनामुळे कट्टरता मोठ्या प्रमाणात नियंत्रित झाली. एकेश्वरवादी आणि समतावादी शीखधर्म आणि आर्य समाज इस्लाम प्रभावाचा परिणाम आहे. समतेसंबंधी आणि सामाजिक सुधारासंबंधी शासन नियम, तसेच स्त्रीला संपत्तीत अधिकार इ. इस्लाम प्रभावाचा परिणाम आहे.

# बहुपत्नीत्व

बहुपत्नीत्व विषयाला घेऊन इस्लाम आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर आक्षेप केला जातो तो सर्वथा अनुचित आहे. याचे प्रमाण प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या पूर्वीच्या प्रेषितांमध्येसुद्धा पाहावयास मिळते. परंतु आम्ही त्यांचा उल्लेख येथे करणार नाही. हिंदूंच्या काही महापुरुषांचा उल्लेख करू या.

श्रीकृष्ण हिंदू धर्माच्या अवतारामध्ये पूर्ण अवतार मानले जातात. त्यांच्या आठ पटराण्या होत्या आणि सोळाशे राण्या होत्या. तसेच अनेक गोपी आणि राधांबरोबर त्यांचे संबंध होते. श्रीकृष्णाला योगीराज मानतात आणि बहुपत्नीत्वाची आध्यात्मिक व्याख्या केली जाते. त्यांचे जीवन पाण्यातील कमळासारखे निर्मळ मानले जाते. म्हणजेच प्रत्यक्ष बहुपत्नीत्व असूनसुद्धा त्यापासून ते विरक्त होते. श्रीराम तर एकपत्नीधारक होते. परंतु त्यांचे पिता दशरथ बहुपत्नीत्ववादी होते. महाभारताचे नायक अर्जुनाचे पिता यांच्यासुद्धा अनेक पत्नीं होत्या. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या आयुष्याच्या ऐन तारुण्यात म्हणजे वयाच्या २५ व्या वर्षी ४५ वर्षीय विधवा खदीजा (रजि.) यांच्याशी विवाह केला आणि आयुष्याच्या उतारवयापर्यंत म्हणजे वयाच्या ५० वर्षापर्यंत दुसरे लग्न केले नाही, ते एकपत्नीधारी राहिले. या अवस्थेत इंद्रियसुखाची इच्छा सहसा लुप्त होते. त्यांचे इतर विवाह या सत्याला उघड करतात की, त्या स्त्रियांना संरक्षणाची आवश्यकता होती किंवा त्यांच्याद्वारा इस्लामचा हेतू साध्य करावयाचा होता. त्या इतर विवाहांमागे इंद्रियसुख-विलास प्राप्त करणे हा हेतू मुळीच नव्हता. यासाठी अनेक उदाहरणे देता येतील. त्यापैकी एक महत्त्वाचा उल्लेख येथे करू या. एकदा भल्या रात्री आदरणीय आएशा (रजि.) यांनी पाहिले की, प्रेषित मुहम्मद (स.) खोलीत नाहीत. त्यांना वाटले की, कदाचित ते दुसऱ्या पत्नीकडे गेले असतील. म्हणून आएशा (रजि.) उठल्या आणि इकडे तिकडे पाहू लागल्या. तर काय पाहाता, प्रेषित भल्या रात्री नमाज अदा करण्यात मग्न आहेत. (राजेंद्रजींनी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या बहुपत्नीत्वाचे औचित्य सिद्ध केले आहे. परंतु प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासंबंधी ही एक वैशिष्ट्यपूर्ण घटना आहे म्हणून अधिक स्पष्टीकरणाची गरज आहे. राजेंद्रजीनी स्पष्ट केले आहे की, स्त्रियांचे संरक्षण आणि इस्लामचा उद्देश या घटनेमागे होता. याचे अधिक स्पष्टीकरण खालीलप्रमाणे आहे.

१) प्रेषित मुहम्मद (स.) यांचा देश आणि समाज धार्मिक, नैतिक आणि राजनैतिक दृष्टीने अत्यंत पतनग्रस्त झाला होता. पूर्ण क्रांतीद्वारा त्या देशाला एक आदर्श देश आणि आदर्श समाज बनविणे अत्यावश्यक होते. हे अतिकठीण आणि महान कार्य होते. तत्कालीन स्थिती अशी होती की, संपूर्ण देश प्रेषितांचा विरोधक होता. या

स्थितीत आवश्यकता होती की, जे मित्र आणि साहाय्यक होते त्यांच्या संबंधांना अधिक मजबूत बनवावे. जे शत्रू होते ते मित्र जरी बनले नाहीत तर त्यांची शत्रुता कमीतकमी झाली पाहिजे.

२) प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या दोन पत्नी माननीय आएशा (रजि.) आणि हफ़शा (रजि.) आपले परममित्र आणि साथी अबू बकर (रजि.) आणि उमर (रजि.) यांच्या मुली होत्या. माननीय जैनब (रजि.) प्रेषितांची आत्तेबहीण होती. प्रेषितांनी त्यांचा विवाह आपल्या दासाशी (जैद (रजि.) यांच्याशी) केला होता. दोघांत शेवटपर्यंत पटले नाही आणि जैद (रजि.) यांनी तलाक दिला. जैद (रजि.) प्रेषितांचे दास आणि मानलेले पुत्र होते. अरबात कुप्रथा होती की, मानलेल्या मुलाला कौटुंबिक आणि सामाजिक स्तरावर कायद्याने खऱ्या मुलासारखे स्थान प्राप्त होते. त्याच्या विधवा अथवा तलाक दिलेल्या पत्नीबरोबर मानलेला पिता विवाह करू शकत नव्हता. इस्लामने या परंपरेचे खंडन केले आणि व्यावहारिक स्तरावर त्याला समाप्त करण्यासाठी स्वत: जैनबशी विवाह करून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ती कुप्रथा कायमस्वरूपी मोडली. (मानलेला हा मानलेला असतो खरा मुळीच नसतो.) माननीय रेहाना, जुबैदा आणि सफिया (रजि.) श्रीमंत यहुदींच्या मुली होत्या. त्यांच्याबरोबर विवाह केल्याने अबू सुफियानची शत्रुता मंद पडली. माननीय उम्मे सलमा (रजि.) मक्केच्या सरदार आणि प्रेषितांचा कट्टर शत्रुची मुलगी होती. या विवाहानंतर अनेक संबंधित टोळ्यांची इस्लामबद्दलची शत्रुता कमी झाली.

३) प्रेषित मुहम्मद (स.) ज्या धार्मिक, नैतिक आणि सांस्कृतिक क्रांतीसाठी ईश्वराकडून नियुक्त झाले होते, त्यासाठी केवळ पुरुषांचे शिक्षण-प्रशिक्षण करणे फक्त आवश्यक नव्हते, तर स्त्रियांसाठीसुद्धा ही निकडीची गरज होती. इस्लामी सभ्यतेनुसार पुरुष आणि स्त्रियांमध्ये परस्पर संपर्क निषिद्ध आहे. यासाठी प्रेषित स्त्रियांना शिक्षण व प्रशिक्षण देऊ शकत नव्हते. याव्यतिरिक्त स्त्रियांविषयी असे अनेक प्रसंग आहेत, ज्यांना स्त्रिया पुरुषांना सांगू शकत नाही. याचसाठी प्रेषितांनी विभिन्न वयाच्या आणि योग्यतेच्या स्त्रियांशी विवाह केले आणि त्यांना इस्लामचे शिक्षण व प्रशिक्षण देऊन योग्य बनविले, जेणेकरून त्यांनी समाजातील स्त्रियांनासुद्धा शिक्षण-प्रशिक्षण देऊन योग्य बनवावे. प्रेषितांच्या पत्नींपैकी माननीय आएशा (रजि.) आणि माननीय सलमा या विद्वान होत्या. मुहम्मद (स.) यांच्या वचनांना 'हदीस' म्हणतात. हदीसच्या ग्रंथात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या पत्नींनी निवेदन केलेले संस्मरणे वचने असंख्य आहेत.

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या अधिक विवाहांचा वरील उद्देश होता. त्यांना इंद्रियवासनेवर तर इतके नियंत्रण होते की, पंचवीस वर्षाचे असताना त्यांनी पंचेचाळीस वर्षे वयाच्या महिलेशी (खदिजा) विवाह केला आणि हा प्रथम विवाह पंचवीस वर्षे टिकला. माननीय खदिजा (रजि.) यांच्या निधनानंतरच माननीय सौदा (रजि.) ज्या वृद्ध महिला होत्या आणि विधवा होत्या, त्यांच्याशी विवाह केला. अन्य विवाह प्रेषितांनी वयाच्या ५३ वर्षानंतर केले, जेव्हा इंद्रियकामना क्षीण होते. या पत्नीं असतानासुद्धा रात्री प्रेषित मुहम्मद (स.) नमाजमध्ये इतके मग्न होत की, बराच काळ उभे राहून त्यांचे पाय सुजत असत.)

## सर्वसामान्यांचे बहुपत्नीत्व

इस्लामने सर्वसामान्य व्यक्तीला चार पत्नी करण्यास परवानगी दिली आहे. यावर आक्षेप घेणारे त्याच्या तथ्यांशी अवगत नाहीत. प्रथम हे जाणून घेतले पाहिजे की, चार पत्नी करण्याची आज्ञा दिली नाही केवळ परवानगी आहे. दुसरे असे की, चार पत्नींची अनुमती कोणत्या स्थितीत आणि कोणत्या उद्देशांसाठी दिली आहे? इस्लामपूर्व काळात अरब लोक दहादहा पत्नीं करत आणि त्यांना अतोनात कष्ट देत, त्यांच्यावर अत्याचार करीत असत. पत्नींदरम्यान ते न्यायसंगत व्यवहार करीत नसत. या दुराचाराला दूर करण्यासाठी चारपेक्षा अधिक पत्नींवर प्रतिबंध लावण्यात आला. चार पत्नींची परवानगी सशर्त आहे. त्यांच्याबरोबर न्यायसंगत आणि समतेचा व्यवहार केला जावा. ज्या समाजाचा स्वभाव बहुपत्नीत्व बनला होता, त्याला जर ही आज्ञा दिली गेली असती की, एकपत्नीत्व स्वीकारा, अशा स्थितीत आज्ञापालन झालेच नसते. लपूनछपून ह्या आज्ञेची अवहेलना सतत झाली असती. (आजच्या 'सुसभ्य' समाजात असले प्रकार होणे स्वाभाविक बनले आहे.) एक शुद्ध समाजनिर्मिती इस्लामच्या ध्येयानुसार झाली नसती. समाज सर्वथा दूषित बनून गेला असता. एकापेक्षा अधिक पत्नींची आवश्यकता त्याच काळात नव्हती, तर आजसुद्धा आहे. व्यक्तिगत रूपात आमच्या समाजाला याची आवश्यकता भासू शकते. सद्विवेक बुद्धीचा मनुष्य स्वीकार करेल की, समाजाला शुद्ध राखण्यासाठी इस्लामच्या बहुपत्नीत्वाचा नियम अतिदूरदर्शितेवर अवलंबून आहे. (वेश्यावृत्ती, अवैध व अनैतिक यौनसंबंध, मान्यताप्राप्त वेश्यालय,कॉलगर्ल्सची कुप्रथा आणि इतर अनेकानेक अनैतिक विकार, सामाजिक अपराध तसेच यापासून होणारी हानी आणि समस्या आज समाजात बहुपत्नीत्व वर्जित करण्यामुळे निर्माण झाल्या आहेत. इस्लामने बहुपत्नीत्वाची अनुमती देऊन, मुस्लिम स्त्री, पुरुष, कुटुंब, समाजाला कुप्रथेपासून वाचविले आहे.)

वरील विवेचनावरून हे तथ्य स्पष्ट होते की, एकापेक्षा अधिक पत्नी करण्याची

अनुमती देऊन दहा-दहा पत्नी करण्याचा निषेध केला. दुसरीकडे समाजाला दूषित करणाऱ्या वेश्यावृत्ती, व्यभिचार, रखेल ठेवणे इ. कुप्रथांसाठी दार बंद केले. चारची अनुमती सर्वांमध्ये समता आणि न्यायासाठी अट ठेवून एक प्रकारे अनावश्यक विवाह करण्यापासून रोखले आहे. या बंधनामुळे चार विवाहसुद्धा रोखले गेले आहेत.

हा एक धार्मिक नियम होता आणि समाज धर्मनिष्ठ होता म्हणून समाज त्या नियमांचे काटेकोर पालन करत होता. परंतु जे एकपत्नीत्वाचे समर्थक आणि एकापेक्षा जास्तचे विरोधक आहेत, त्यांचे आचरण काय आहे? आणि त्यांच्या समाजाची दशा काय आहे? इस्लामच्या बहुपत्नीत्वाच्या नियमाविरुद्ध सर्वांत जास्त अपप्रचार यूरोप आणि अमेरिकेतील ख्रिश्चनांनी केला आहे.

यूरोप आणि अमेरिकेत एकापेक्षा अधिक पत्नींवर प्रतिबंध घालून व्यभिचाराचे द्वार खुले झाले आहे. कॉलगर्ल, रखेली, सोसायटी गर्ल, वेश्या, क्लब, हॉटेल, डान्सबार समाजमान्य बनले आहेत. सर्वसामान्य लोकसुद्धा व्यभिचारी, प्रमुख वर्गसुद्धा व्यभिचारी, पार्लमेंटचे सदस्य व्यभिचारी, मंत्री व्यभिचारी, तसेच पादरीसुद्धा व्यभिचारी! जी अवस्था पुरुषांची आहे तीच स्त्रियांची आहे. तिथे कोणताही वर्ग असा शिल्लक नाही ज्याची स्त्री व्यभिचारी नाही. जिथे व्यभिचाराची अशी चलती असेल तिथे एकापेक्षा अधिक पत्नी कशासाठी? आता एक वर्ग असा निर्माण झाला आहे जो विवाहविरुद्ध आहे. स्वतंत्रपणे कामानंद उपभोगू इच्छितो.

आम्हाला आमच्या देशाच्या स्थितीकडेसुद्धा लक्ष दिले पाहिजे. आमचा देशसुद्धा ह्या दुराचारापासून मुक्त नाही. येथे धर्म प्रभावहीन बनला आहे आणि वैज्ञानिक नियम प्रभावकारी नाहीत. (इस्लाम प्रत्येक मूल्यासाठी समाजाला शुद्ध बनवू इच्छितो. व्यभिचार सर्व कर्मांपेक्षा अधिक दूषित कर्म आहे. इस्लामने व्यभिचाराला धार्मिक पाप आणि नैतिक तथा सामाजिक अपराध ठरविले आहे. व्यभिचारीला कठोर शिक्षा निर्धारित केली आहे. समाज शुद्ध राखण्यासाठी आणि नारीशोषण आणि अपमान रोखण्यासाठी निर्धारित या दंडविधानाला बर्बतापूर्ण ठरवून इस्लामला बदनाम करण्यात येत आहे. तसे पाहाता बलात्कारीला मृत्यूदंडाची शिक्षा देण्यासाठी लोकसभेत कायदा पास करण्यात यावा ही मागणी भाजपाने केली होती.

यूरोप आणि अमेरिका तथाकथित सभ्य आणि मानवप्रेमी या दंडात्मक कारवाईला कठोरच नव्हे तर अमानवी ठरवीत आहेत. ते अशासाठी म्हणतात की, व्यभिचाराला ते निषिद्ध कर्म आणि धार्मिक, नैतिक व सामाजिक पाप मानतच नाहीत. व्यभिचार यूरोप, अमेरिकेतील लोकांच्या जीवनाचा अविभाज्य अंग बनला आहे. आजपासून सुमारे चार वर्षांपूर्वीची घटना आहे. डब्लन युनिव्हर्सिटीतील प्राध्यापकाच्या अध्यक्षतेखाली

यूरोपातील विश्वविख्यात विधिज्ञांचे शिष्टमंडळ इस्लामी कायद्यांचा अभ्यास करण्यासाठी सौदी अरेबियात गेले होते. त्यांना सांगितले गेले आणि परवानगी दिली की, अपराध विभागात जाऊन त्यांनी पाहावे की या देशात (सौदी अरेबियात) अपराधांची काय स्थिती आहे? त्यांनी तेथे जाऊन पाहिले तर आश्चर्यचकित झाले. लोकसंख्येच्या आधारावर अपराधांचे प्रमाण यूरोपात १००० तर सौदी अरबमध्ये १ (एक) आहे. इस्लाममध्ये व्यभिचाराचा दंड दगड मारून मारून व्यभिचारीला ठार करणे आणि चोराचे हात कापणे अमानवी दंड आहे, असे त्या शिष्टमंडळाचे मत होते. त्यांना सांगण्यात आले, एक करोड डॉलर एखाद्या व्यक्तीकडे देऊन एखाद्या निश्चित स्थानावर जाण्यास सांगा. ती व्यक्ती सुखरुपपणे ती रक्कम निश्चित स्थानावर सुरक्षित नेऊन देईल. यूरोपमध्ये मात्र दरोडे दररोजचे पडतात आणि लोक मारले जातात. इस्लामी कायदेविधानाचे वैशिष्ट्य आणि प्रभाव पाहून ते शिष्टमंडळ आपल्या मान्यतेवर लज्जित झाले. त्यांनी पत्रकार परिषदेमध्ये स्पष्ट केले की, इस्लामी कायदेविधानच अपराधाला नष्ट करू शकते.

शेवटी आपण पाहू या की, हिंदू धर्म व्यभिचारासाठी कोणता दंड देतो? मनुस्मृतीचे काही नियम खालीलप्रमाणे आहेत. १) कोणी शूद्र द्विजाति म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या एखाद्या स्त्रीबरोबर संभोग करेल तर त्याला प्राणदंड दिला गेला पाहिजे. २) परस्त्रीबरोबर संभोग करणाऱ्याला दंडित करून अंगावरील कपडे काढून त्याला वस्तीबाहेर पिटाळले गेले पाहिजे. ३) जो कुणी एखाद्या कुमारिकेवर बलात्कार करून तिला दूषित करील त्याचा वध केला जावा, परंतु कुमारिकेच्या संमतीने झाले आणि पुरुष स्वजातीय असेल तर वध केला जाऊ नये. ४) उत्तम जातीच्या पुरुषासोबत संभोग करण्याची इच्छा त्याची सेवा करणाऱ्या कुमारिकेने केल्यास दंडित होणार नाही. परंतु हीन जातीकडे जाणारी कन्या दंडित होईल. उच्च वर्णाच्या कन्येशी संभोग करणाऱ्या नीचवर्णा पुरुषाचा वध करावा.)

हिंदू बंधुंनी विचार करावा की, ईश्वराचा पूर्ण अवतार श्रीकृष्ण हा बहुपत्नी होता, तसेच पौराणिक आणि ऐतिहासिक महापुरुष बहुपत्नी होते. हिंदू धर्मात तर बहुपत्नीत्वाबरोबर बहुपतीत्वाचासुद्धा उल्लेख आलेला आहे. पांडवांची पत्नी बहुपती होती. निष्पक्ष विचार करणारी व्यक्ती या निर्णयाप्रत येते की इस्लामचे बहुपत्नीत्व आणि त्याचे नियम मुस्लिमेतरांच्या अवैध वेश्यावृत्ती, रखेलीद्वारा उत्पन्न निर्दोष संतानासाठी श्रेयस्कर आणि गौरवपूर्ण आहे.

# इस्लामी बुरखापद्धत

नेहमीच हा प्रश्न विचारला जातो की, इस्लामची बुरखापद्धत स्त्री-पुरुषात भेद निर्माण करणारी आणि स्त्रियांच्या स्वास्थ्य आणि उन्नतीच्या आड येणारी आहे?

आमचे एका वाक्यात उत्तर आहे की, इस्लामी बुरखापद्धत सर्वथा उचित आणि अत्यावश्यक आहे. जिथे स्त्रीपुरुषांच्या समानतेचा प्रश्न आहे, इस्लामनेच सर्वप्रथम स्त्रीजातीला संपत्तीचा अधिकार प्राप्त करून दिला. इस्लामने स्त्रीला अनिवार्य परिस्थितीत पतित्याग (खुलअ) चा अधिकार दिला आणि महेरची रक्कम प्राप्त करण्याचा अधिकार दिला. याविरुद्ध हिंदू धर्मात विधवांना जीवित जाळले जात असे. त्यांचे स्वतंत्र अस्तित्वच नव्हते. इस्लाममध्ये विधवांना हक्क आहे की पतीमृत्यूनंतर चार महिने व दहा दिवसांनंतर दुसरा विवाह करू शकते आणि सुखी जीवन जगावे. (ही चार महिने १० दिवसांची अट यासाठी आहे की जर ती गर्भवती असेल तर या अवधित ते स्पष्ट होते आणि दुसऱ्या विवाहाने स्थापित दांपत्यसंबंधात कोणतीही बाधा नंतर येऊ नये.) हिंदू धर्मात विधवेला दुसरा विवाह करण्याचा अधिकार नव्हता की सुखी जीवन जगण्याचासुद्धा अधिकार नव्हता. विधवेला आपल्या कुटुंबातच तिरस्कृत आणि अपमानित जीवन जगावे लागत असे.

ख्रिश्चन देशांमध्ये अद्याप स्त्रियांना संपत्तीत अधिकार पूर्णत: बहाल केला गेला नाही. एक काळ होता जेव्हा यूरोपियन विद्वानांत याविषयी वादविवाद होत असे की, स्त्रियांमध्ये आत्मा आहे किंवा नाही? बुरखा स्त्रियांच्या स्वास्थ्यासाठी आणि प्रगतीच्या मार्गात बाधक का म्हणून आहे? स्वास्थ्यासाठी स्त्रियांनी अर्धनग्न फिरावे का? स्त्रियांना केवळ बुरखा घालण्याची आज्ञा आहे. ती आपल्या पतीसह बुरखा घालून बाहेर फिरण्यास जाऊ शकते, याची मनाई इस्लाम करत नाही. मुस्लिम स्त्री निरोगी राहू शकत नाही, तर ती निरोगी बाळाला जन्म कशी देऊ शकते? पुरातन काळात तर कठोर बुरखापद्धत समाजात प्रचलित होती. त्यावेळी दिग्विजय प्राप्त करणारे मुस्लिम, मुस्लिम मातांची संतान नव्हती काय? स्त्रियांचे आरोग्य, प्रगती, समता, समानता इ. प्रश्न युरोप व अमेरिकेने निर्माण केलेले आहेत. त्यांनी तर स्त्रियांना फक्त कामवासनापूर्तीचे साधन मात्र बनवून ठेवले आहे. प्रत्येक धर्मात व प्राचीन सभ्यतेत धन कमविणे पुरुषाचे कर्तव्य होते आणि स्त्रियांचे क्षेत्र घर होते. हिंदू धर्म आणि संस्कृतीमध्ये स्त्रियांना कधी कमावून आणण्याची जबाबदारी टाकली गेली? स्त्री-पुरुषांची समानता आणि समान अधिकाराचा प्रश्नसुद्धा त्या तथाकथित 'सभ्य' समाजाने निर्माण केला. या स्त्रीअधिकार समर्थकांनी ईश्वराकडे मागणी करावी की, स्त्री आणि पुरुष एकसारखे निर्माण करावेत. पुरुषानेसुद्धा मूल जन्माला घातले पाहिजे फक्त

स्त्रियांनीच हे कष्ट का उचलावे?

शरीरविज्ञान आणि मानसशास्त्रानुसार, स्त्रिया शरीराने आणि मनाने कोमल असतात. पडदा (बुरखा) स्त्रियांच्या रक्षणासाठी सर्वथा उपयोगी आहे. पडदा स्त्रियांना दुसऱ्यांच्या कुदृष्टीपासून सुरक्षित ठेवतो. कुदृष्टीचे परिणाम कधीकधी महाभयंकर होतात. अपहरण आणि बलात्कार कुदृष्टीचेही परिणाम आहेत. पथ्य न पाळता आजारी पडणे बुद्धिमत्तेचे लक्षण ठरत नाही. (स्त्रियांच्या बुरखापद्धतीवर तेच आक्षेप घेतात ज्यांच्या दृष्टीने स्त्रीत्व आणि शीलाचे काहीच महत्त्व नाही. स्त्रियांना ते पुरुषांच्या कामवासनापूर्तीचे साधन मात्र समजतात. असे लोक इस्लामच्या बुरखापद्धतीचे महत्त्व काय जाणणार? स्त्रीमध्ये पुरुषाविषयी आणि पुरुषामध्ये स्त्रीविषयी आकर्षण ठेवले गेले आहे. स्त्रियांची अर्धनग्नताच व्यभिचाराचे प्रवेशद्वार आहे. इस्लाम या प्रवेशद्वाराला बुरखापद्धतीने बंद करतो. स्त्रियांची सर्वांत मौल्यवान संपत्ती तिचे शील आहे आणि इस्लाम स्त्री शील रक्षणकर्ता आहे, म्हणूनच बुरखापद्धती विरोधी लोक इस्लामचे शत्रू आहेत.

भारत बुरखापद्धतीने अवगत नव्हता. मुस्लिम भारतात आले, हिंदूनी पाहिले की मुस्लिम स्त्रिया बुरख्यात राहतात. त्यांच्यामध्ये बुरखापद्धत प्रचलित झाली, जेव्हा त्याचे महत्त्व त्यांना पटले. आता हिंदूंना असे वाटू लागले की, पडदापद्धत मुस्लिमांची आहे आणि ती हिंदू संस्कृतीच्या विरुद्ध आहे म्हणून पडदापद्धतीचा त्याग करण्यात आला. परिणामत: तरुणींनी ओढणीचासुद्धा त्याग केला. स्त्रीअंगप्रदर्शन नित्याचे झाले आहे. याचा परिणाम जो व्हायचा तोच झाला. बलात्कार आणि अपहरणाचे प्रकार वाढतच जात आहेत. हीच स्थिती राहिली तर भारताची यूरोप आणि अमेरिकासारखी दशा होईल. यूरोप आणि अमेरिकेत मनुष्य आज पशु बनला आहे, नव्हे पशुपेक्षासुद्धा खालच्या दर्जाचा बनला आहे.)

# गोवधाचा प्रश्न

प्रश्न विचारला जातो की, इस्लाम डुकराच्या मांसावर तर प्रतिबंध लावतो पण गायीच्या मांसावर का प्रतिबंध लावत नाही? हे उचित आहे काय ? हा प्रश्नच मुळी बुद्धिविवेकाविरुद्ध आहे.

सामान्य मनुष्यसुद्धा गाय आणि डुकारातील फरकाला जाणतो. डुक्कर हा घृणित पशु आहे. गाय हिंदू मुस्लिम सर्व आपल्या घरी पाळतात. परंतु डुक्कर घाणीत लोळणारा प्राणी आहे. डुकराच्या मांसावर प्रतिबंध उचित आहे. (राजेंद्रजींनी फक्त गोवधच्या प्रश्नाला समोर ठेवून चर्चा केलीली आहे. परंतु या प्रश्नासोबत जीवहत्याचा प्रश्नसुद्धा जोडला गेला आहे. इस्लामवर हा आक्षेप घेतला जातो की, तो जीवहिंसेची अनुमती देतो. खरं तर हा प्रश्न गोरक्षा प्रश्नाला भावनात्मक आणि धार्मिक, उत्तेजक बनविण्यासाठी समोर आणला जातो, जो बुद्धी, ज्ञानविज्ञान, कार्यव्यवहाराच्या अनुकूल नाही, वास्तविकता ही आहे की, हिंदू धर्मात मांसाहाराची अनुमती दिली गेली आहे. "ब्राह्मण यज्ञच्या निमित्ताने पशुपक्ष्यांचा वध करू शकतो कारण अगस्ति मुनींनी असे केले आहे."(मनुस्मृती ५-२२)

पूर्वी ऋषी, ब्राह्मण, क्षत्रिय यांनी जे यज्ञ केले त्यातसुद्धा पशुपक्ष्यांची आहुती देण्यात आली आहे. (मनुस्मृती ५:२३)

विनोबाजी गीता प्रवचनात म्हणतात, 'भवभूति रामचरित्रा'मध्ये एका घटनेचा उल्लेख आला आहे. वाल्मिकींच्या आश्रमामध्ये एकदा वशिष्ठ ऋषी आले. त्यांच्या स्वागताप्रित्यर्थ एक गायीचा लहान बछडा कापला. त्यावेळी एक लहान बालक मोठ्या मुलाला म्हणतो की, आज आमच्या आश्रमात एक दाढीवाला आला आणि त्याने आमच्या गायीचा बछडा मारला. मोठा मुलगा म्हणतो अरे ते तर वरिष्ठ ऋषी आहेत, अशी वायफळ बडबड करू नकोस.' (गीता प्रवचन, अध्याय ७, पृष्ठ २५६) गायीच्या मांसाला इस्लामने विहित ठरविले आहे. परंतु अनिवार्य नाही. इस्लामचे सर्व नियम बुद्धी, ज्ञान आणि तर्कावर आधारित आहेत, केवळ धार्मिक भावनेवर मुळीच नाहीत. इस्लाम शुद्ध एकेश्वरवादी धर्म आहे. तो गायीला पूज्य मानीत नाही. हिंदुमतानुसार सिंधू खोऱ्यातील संस्कृतीमध्ये हिंदूंची गायीला धार्मिक मान्यता नव्हती. आर्य जे कृषी संस्कृतीचे जनक होते तेसुद्धा विशेषप्रसंगी बैलाचे मांस उपयोगात आणत. यज्ञामध्ये अत्याधिक जीवहिंसा होत होती. गोमेघ यज्ञ प्रसिद्ध होते. बौद्ध अंहिसा ह्याच अत्याधिक हिंसेच्या प्रतिक्रियास्वरुप प्रकट झाली. परंतु बौद्ध अंहिसासुद्धा व्यावहारिक सिद्ध झाली नाही. अनेक बौद्ध लोक मांसाहारी आहेत. म्हशी आणि बकऱ्यांचा बळी देणे अद्याप चालू आहे. जगातील सर्व प्रकारचे लोक आणि सर्व धर्माचे अनुयायींमध्ये मांसाहारी सापडतात. भारतात छोट्या

वर्गाला सोडले तर सर्व हिंदू मांसाहारी आहेत. एकीकडे देवीदेवतांपुढे जनावरांचे बळी देणे चालूच आहे. तसेच मांसाहार जोरात चालूच आहे आणि दुसरीकडे इस्लामवर जीवहत्याचा आक्षेप घेतला जातो? इस्लाम कुण्या एका देशाचा अथवा लोकसमूहाचा धर्म नाही. इस्लाम वैश्विक ईशधर्म आहे. जगात अनेक देश आहेत ज्यांची मुख्य उपजीविका मांस आणि मासे आहेत. सार्वभौम इस्लाम जीवहिंसेवर प्रतिबंध कसा लागू करणार?

## इस्लामी राज्यासंबंधी प्रश्न

सर्वसाधारणपणे असा समज आहे की, राम, विक्रमादित्य आणि अशोक यांच्यासारखे आदर्श राज्य इस्लामद्वारा स्थापित झालेले नाही, परंतु वस्तुस्थिती तशी नाही. रामराज्याची आधारशिला ऐतिहासिक नसून पौराणिक आणि काल्पनिक आहे. तसेच सीता निर्वासन आणि ब्राह्मणवादाला पोषक तत्त्वांमुळे आधुनिक काळात टीकेचा विषय बनला आहे. दक्षिण भारतात तुलसीकृत रामायणाचा आदर केला जात नाही. अशोकचे धर्मराज्य तोपर्यंत जीवंत राहिले जोपर्यंत अशोक जीवंत राहिला. अशोकनंतर भारताचा शतकांचा इतिहास अंधकारमय होता. बौद्ध धर्म प्रसारनीतिसाठी प्रसिद्ध आहे, आदर्श आणि स्थायी शासनासाठी नाही. डॉ. भांडारकरांनी अशोकबद्दल फार काही लिहून ठेवले आहे. विक्रमादित्याचे युग स्वर्णयुग होते, परंतु आंतरराष्ट्रीय आधारावर नव्हे. भारतात त्या काळी बहुसंख्य हिंदू होते. या दृष्टिकोनातून शेरशाह, अकबर, जहाँगीर, शाहजहाँ यांचे ऐतिहासिक स्वर्णयुग अधिक प्रभावशाली आणि प्रशंसनीय होते. या सर्वांचे साम्राज्य अधिक विस्तृत होते. हिंदू बहुसंख्य होते आणि शासक अल्पसंख्य होते. त्यांची धार्मिक उदारता आणि तत्कालीन सुखसमृद्धी अधिक प्रभावशाली होती. वैश्विक दृष्टिकोनातून प्रेषित मुहम्मद (स.) यांचे चार खलीफा (राजप्रमुख) यांचे साधे जीवन आणि न्याय, सुखशांतीच्या आदर्श शासनाचे इतिहासात दुसरे उदाहरण सापडत नाही. वर्तमानकाळातील महागाई, भ्रष्टाचार, अन्याय, असहिष्णुता, असाध्य रोगव्याप्त देशांकडे पाहून मूल्याधिष्ठित अल्लाउद्दीन, सहिष्णु शेरशाह आणि सर्वोच्च शासकाच्या रूपात व्यक्तिगत पवित्रतेसाठी प्रसिद्ध औरंगजेब सहजतेने आठवतात.

# मुस्लिमांवर पृथकवादाचा आरोप

मुस्लिमांवर आरोप लावला जातो की, ते पृथकतावादी आहेत. भारतात जे आले ते लोक हिंदूंमध्ये मिळून मिसळून एक झाले, परंतु मुस्लिम आपले वेगळेपण अद्याप राखून आहेत. मुस्लिमांवर हा आरोप लावणारे त्याची कारणामीमांसा करत नाहीत. मुस्लिमांच्या अगोदर जे लोक भारतात आले त्यांच्याकडे हिंदू धर्मासारखे धर्म नव्हते की ज्ञान विचार काहीच नव्हते, म्हणून ते हिंदू धर्मात मिसळून गेले. परंतु याचा काय परिणाम झाला? हिंदू धर्म विकृत झाला. वर्तमान हिंदू धर्म वैदिक धर्म राहिला नाही. आजचा हिंदू धर्म अनेक धर्मांचे मिश्रण आहे.

दुसऱ्या जातीधर्माच्या उलट मुस्लिम भारतात एक महान धर्म, एक महान ग्रंथ, एक महान धर्मनेता आणि त्यांचे आदर्श जीवनचरित्र, तसेच विशाल इतिहासासह आले होते. मुस्लिम विशुद्ध एकेश्वरवादी आहेत. त्यांचा मूळाधार कलमा (मूळमंत्र) 'अल्लाहशिवाय कोणीही ईश्वर नाही आणि मुहम्मद (स.) अल्लाहचे प्रेषित आहेत.' मुस्लिमांसाठी अभिमानास्पद आहे की, ते अल्लाहव्यतिरिक्त कोणाच्याही पुढे नतमस्तक होत नाहीत. भारतात असंख्य देवालये त्या वेळी होती (आजही आहेत) तिथे अनेकानेक काल्पनिक देवीदेवतांची पूजाअर्चा होत होती, तसेच पशु-पक्ष्यांचीसुद्धा पूजा होत असे आणि आजही होत आहे, हिंदू धर्मात अवतारवाद मान्य आहे, तर प्रेषित मुहम्मद (स.) हे ईश्वरउपासक भक्त आणि अंतिम प्रेषित आहेत. इस्लाममध्ये सर्व समान आहेत. मुस्लिम आपली संस्कृती, भाषा यांना सुरक्षित ठेवू इच्छितात, तर अशा वेळी त्यांच्यावर राष्ट्रद्रोही म्हणून आक्षेप घेतला जातो. हिंदूंची स्थिती काय आहे? भारतात सर्व हिंदू आहेत, तर त्यांची भाषा भिन्नभिन्न का आहे? आणि भाषावार प्रांतरचना का बनली आहे? दक्षिणेतील हिंदूंतर हिंदीचा कडाडून विरोध करतात! शीख लोक आपले स्वतंत्र राज्य निर्माण करू इच्छितात. काश्मीरमध्ये मुस्लिम बहुमतात असल्याने जम्मूतील हिंदूंना ते असह्य झाले आहेत. जम्मूला हिमाचल प्रदेशात विलीन करण्याची ते भाषा करतात. भारतातील सर्व राज्ये केंद्राजवळ जास्त अधिकार म्हणजेच अधिक स्वायत्ततेची मागणी करतात. परंतु पृथकता आणि राष्ट्रविरोधी ठरविले जातात, मात्र मुस्लिम! हा कोणता न्याय आहे? काही मुख्य गोष्टींना वगळता मुस्लिम कोणत्या गोष्टींत राष्ट्रविरोधी आहेत? पोलीस भरतीमध्ये त्यांना नगण्य स्थान का दिले जाते? ६५ वर्षांपासून मुस्लिमांवर हा अन्याय केला जात आहे.

# मुस्लिमांवर अराष्ट्रीयतेचा आरोप

मुस्लिमांचा दृष्टिकोन राष्ट्रीय अजिबात नाही, असा आरोप नेहमीच लावला जातो आणि हे सर्व लोक अरब आणि अन्य मुस्लिम राष्ट्रांपासून प्रेरणा ग्रहण करतात.

ही धारणा पूर्णत: खोटी आहे आणि देशात यापेक्षा जास्त द्वेषमूलक आणि दूषित विचारधारा असू शकत नाही. या प्रचाराएवढा खोटा प्रचार दुसरा असू शकत नाही. इतिहास मात्र या विचारधारेविरुद्ध साक्ष देत आहे. भारतात मुस्लिम शासन इ. स. ७१२ ते १८५७ पर्यंत स्थायी स्वरुपात होते. ते भारतासाठीच जीवंत राहिले आणि भारतासाठीच मरण पावले होते. सामान्य बुद्धी ठेवणारासुद्धा असे म्हणू शकत नाही की, अराष्ट्रीय लोक एखाद्या देशात एक हजार वर्षांपर्यत स्थायी निवास करू शकतात. ऐवढेच नव्हे तर एक हजार वर्षापर्यंत येथे शासन केले. ते जर अराष्ट्रीय असते तर बहुसंख्य हिंदूंनी सामुदायिक विद्रोह केला असता, परंतु एक हजार वर्षांच्या या प्रदीर्घ कालावधीत असे काहीच घडले नाही. आरंभीचा काळ सोडल्यास जितकी युद्धे झाली त्यात एकीकडे सर्व हिंदू आणि दुसरीकडे सर्व मुस्लिम असे चित्र कधीच नव्हते. हिंदू मुस्लिम मिळून मिसळून राजकीय साम्राज्याचे स्तंभ राहिले आहेत. काबूलवर मुगल साम्राज्याचा मानसिहद्वारा विजय भारतीय विजय समजला गेला होता. छत्रपती शिवाजी महाराजांच्या सैन्यदलात प्रमुख पदांवर मुस्लिमसुद्धा होते. औरंगजेबाचे सेनापती राजा जयसिंह होते. इतिहासावरून सिद्ध होते की, हिंदूंनी मुस्लिम राज्याला विदेशी राज्य कधीही मानले नाही. इ. स. १८५७ च्या स्वातंत्र्यलढ्यामध्ये हिंदू मुस्लिमांनी ब्रिटीश शासनाविरुद्ध एकदिलाने विरोध केला. हा स्वातंत्र्यसमर मुगल सम्राज्याचे बहादुर शाह जफरच्या नेतृत्वाखाली लढला गेला होता, आणि हिंदूंनी इंग्रजाविरुद्ध लढण्यासाठी बहादुर शाह जफरचे नेतृत्व मान्य केले होते. भारताच्या प्रथम स्वातंत्र्ययुद्धात (१८५७) मुस्लिमांचे योगदान हिंदूबरोबरीचे होते. १९२०-२१ मध्ये काँग्रेस शक्तिशाली तेव्हाच बनली जेव्हा मुस्लिमांनी खिलाफत चळवळ काँग्रेसमध्ये विलीन करून टाकली. इ. स. १९१६ मध्ये मो. अली जिन्ना यांच्या प्रभावाखाली काँग्रेसबरोबर संपूर्ण सहकार्याचा करार झाला. भारत स्वतंत्र होण्यापर्यंत सीमाप्रांत जो पूर्ण मुस्लिम बहुल होता, तो अब्दूल गफ्फार खान यांच्या नेतृत्वात काँग्रेससह राहिला. सुभाषचंद्र बोस यांच्या आझाद हिंद फौजेत मुस्लिमांचा सहयोग अभूतपूर्व होता. क्रांतिकारकांमध्ये अशफाकउल्ला यांचे नाव प्रथम श्रेणीतले आहे. काँग्रेस अबुल कलाम आझाद आणि हिफजुर्रहमान यांच्याशिवाय अपूर्ण बनते. हे सत्य आहे की, पाकिस्तानची निर्मिती झाली आहे, परंतु त्याचे जनक जिन्नासुद्धा राष्ट्रवादी होते. इ. स. १९३७ मध्ये काँग्रेसने मंत्रिमंडळात दोन पदे मुस्लिम लीगला देण्याचे वचन दिले होते. परंतु काँग्रेसने ते वचन पाळले नाही आणि मुस्लिम लीगचे दोन सदस्य काँग्रेसमध्ये सामील होण्याची अट

घातली. हा जिन्नांचा घोर अपमान होता. पाकिस्तान निर्मितीचे उत्तरदायित्व फक्त मुस्लिम नेत्यांकडेच जात नाही, तर हिंदू काँग्रेसी नेता आणि त्यांची अदूरदर्शिता व गर्वाकडेसुद्धा येते. सौदेबाजीचीसुद्धा मर्यादा आहे. सत्य हे आहे की, पाकिस्ताननिर्मिती मुस्लिम किंवा हिंदूंनी केलेली नाही, तर ती निर्मिती अदूरदर्शी नेते मंडळींनी केली, मग ते हिंदू किंवा मुस्लिम नेतेमंडळी असोत! या पाकिस्तान निर्मितीसाठी काँग्रेस पक्षच मुख्य जबाबदार आणि अधिक उत्तरदायी आहे. एकीकडे काँग्रेस स्वत:ला संपूर्ण भारताचे प्रतिनिधित्व करणारा पक्ष म्हणून दावा करत होती, तर दुसरीकडे हिंदूंचे प्रतिनिधित्व करण्याचा दावासुद्धा करत होती. म्हणून जे व्हायचे तेच झाले. दोन युद्धे पाकिस्ताबरोबर झाली. भारतीय मुस्लिम पाकिस्तानचे पाठीराखे बनले काय? अब्दुल हमीदचे बलिदान ऐतिहासिक बलिदान नाही? इकबाल यांच्या राष्ट्रगीतापेक्षा उत्तम कुणाचे राष्ट्रगीत आहे? जर मलीक मुहम्मद जायसी, रसखान, कुतबन, शेख, कबीर, रहीम आणि सर्वोपरी हिंदीचे जनक खुसरो यांना हिंदीपासून अलग केले, तर हिंदीचे महत्त्व बाकी राहील काय? मुस्लिमांनी भारतात कधी हिंदीचा विरोध केला आहे काय? दक्षिण भारताच्या हिंदू लोकांचा हिंदीला विरोध आहे, तर शेख अब्दुल्ला यांनी हिंदीला जोरदार पाठिंबा दिला होता. भारतातील मुस्लिमांची उर्दूसाठी द्वितीय भाषा मान्य करण्याची मागणी अगदी उचित आहे. ही त्यांची रास्त मागणी अद्याप मान्य केली गेली नाही. मक्का आणि मदीना जगातील सर्व मुस्लिमांचे तीर्थस्थान आहे. त्यांच्यापासून प्रेरणा घेण्यात आपत्तीजनक काय आहे? जर इंग्लंडचा इंग्रजी मनुष्य जेरूसलेमचा श्रद्धाळू आहे, तर तो इंग्लंडसाठी राष्ट्रविरोधक ठरतो का? ब्रह्मदेशातील बौद्ध सारनाथबद्दल श्रद्धा बाळगतो, तर तो ब्रह्मदेशविरुद्ध (राष्ट्रद्रोही) ठरतो काय? नेपाळमधील हिंदू काशीबद्दल श्रद्धा बाळगत नाही? हिंदूंचा हा आरोप की, मुस्लिम अराष्ट्रीय आहेत, कारण ते अरब आणि अन्य मुस्लिम देशांपासून प्रेरणा घेतात. एक तथ्यहीन आरोप आहे. भारताबाहेर हिंदूंचे तीर्थ जगात दुसरीकडे नाहीत काय?

- समाप्त -